


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






महाराष्ट्र - साहित्य - परिषद्

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

[ त्रैमासिक ]

## ७२

संपादक— श्री. रामचंद्र श्रीपाद जोग

आश्विन १८६६

वर्ष १७ वें ] आक्टोबर १९४४ [ अंक ४ था

अनुक्रमणिका






# अनुक्रमणिका



---

## साभार स्वीकार

१ अर्थाचा अनर्थ—लें० मा. कृ. शिंदे; प्रका० बबुबाअी वागळे, नवभारत प्रकाशन संस्था, १४ वी खोताची वाडी, मुंबअी नं. ४; मूल्य आठ आणे.

२ तोंडचा घास—लें० शां. रा. भंडारी; प्रका० गो. वा. कुलकर्णी, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर; मूल्य रु. १॥.

३ विद्युल्लेखा—लें० सौ. मालतीबाअी दांडेकर; प्रका० गो. वा. कुलकर्णी, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर; मूल्य रु. १॥.

४ आईबाप व मुलें—लें० के. पी. भागवत; प्रका० कृ. पां. भागवत, ८४६ सदाशिव, पुणें २; मूल्य रु. ३.

५ बारावा हिंदी लेखनाचा रिपोर्ट २ भाग १९२३ ते १९२५—लें० सुपरिंटेंडेंट, प्रिं. ॲन्ड स्टेशनरी, यू. पी., अलाहाबाद; मूल्य १ ला भाग रु. ९। व दुसरा भाग रु. ८.

६ जीवन आणि साहित्य—लें० आचार्य ज. स. भागवत; प्रका० र. ग. जोशी–सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्त मंडळाकरिता, १२ टिळक रस्ता, पुणें २; मूल्य रु. २॥.

### के. भि. ढवळे, मुंबअी, यांचीं प्रकाशनें

७ आअीच्या गोष्टी—लें० मा. म. वैद्य; मूल्य ४ आणे.
८ डॉन क्विक्झोट—लें० मा. पं. शिखरे; मूल्य १० आणे.
९ तिंबूनानांचा रेडिओ—लें० श्री. बा. रानडे; मूल्य १० आणे.
१० माझें पुराण—लें० सौ. आनंदीबाअी कर्वे; मूल्य रु. १।.
११ सुधारक—लें० प्रा. के. गो. पंडित; मूल्य १२ आणे.
१२ चंडखोर चंड्या—लें० बा. गो. नाअीक व रा. द. गुरव; मूल्य रु. १.
१३ मोत्यांचा मळा—लें० के. नारखेडे; मूल्य १० आणे.
१४ आश्रम आणि आश्रमधर्म—लें० गं. भा. वैद्य; मूल्य १० आणे.
१५ पुढे व्हा—लें० यदुनाथ थत्ते; मूल्य रु. १।.

### महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबअी, यांचीं प्रकाशनें

१६ वानरांची सर्कस—लें० वसंत वैद्य; मूल्य ४ आणे.
१७ पालवी— ,, ,, ५ ,,
१८ रत्नकंकण—लें० कु. ताराबाअी जाधव; मूल्य ४ आणे.

[पुढील मजकूर मलपृष्ठ तीनवर पाहा.

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका



## नव-कणिका

स्वप्नांत पाहिलें : मी झालों नव मेघ
जल शिम्पूं— गमलें— जिथे पेटली आग—
मरुभूवर आलों म्हणुनि स्नेहलतेने !—
तों दग्ध कराया मलाच आल्या ज्वाळा—
माझ्याच अुरींचा आटुन जाय जिव्हाळा !

*　　*

विपदेने करितां मम जीवनिं सञ्चार—
झेलले अुरावर मीं वज्राचे वार !
मृदुलता लोपुनी, होय शिलेपरि छाती.
—ही रुळते आता वक्षावर यशमाला
सुखसंवेदन परि जाणवतें न जिवाला !

*　　*

रे ! सहसा मजवर कोसळतां आकाश
हे कितीक आले द्याया धीर जिवांस
लाभला न त्यांच्या वचनें मुळिहि दिलासा
निःस्तब्ध अुभा तूं राहिलास पाठीशीं—
तों बल ये मजला झुंजाया विपदेशीं !

*　　*

लयनिबद्ध अपुले करीत पदविन्यास
मम हृदयीं आली हासत सहसा आस
स्वागतास झालों सिद्ध क्षणिं हर्षाने !
डोकावुन गेली परन्तु शङ्का क्षण ती :
वाढून ठेविली काय निराशा पुढती;

*　　*

तव थोर यशाची स्पर्धा मनिं वाटून
रे ! आलों मी तव करावया अवमान—
तों अुत्थापन तूं दिलेंस येअुन पुढती
भिडविलेस आणिक नयनां स्नेहल नयन.
—अन् जातों आता गात तुझें गुणगान !

*　　*

आकण्ठ रेशमी सेवुनि कमलपराग
ये हंस बघाया ही दुनिअेची बाग—
पल्वलीं गलबला बदकांचा अैकून
तो वदे : "किती हे क्षुद्र...दरिद्री जीव
केवढी— टिपाया कीटक— घेती धाव !"

*　　*

ही रात्र सांपडे मृत्यूच्या फासांत—
अुन्मत्त गर्जतो हा प्रलयङ्कर वात
ही मुसळधार—गडगडाट—वीज नि गारा !
परि अशाच अेका रुद्र-भयङ्कर कालीं
वटपर्णावरती प्रभुमूर्ती अवतरली !

*　　*

आकाशापरि तव विशाल अन्तःकरण—
नेणून— तिथे मीं फेकियले वाग्बाण
परि कळून आला प्रमाद मज तो अन्तीं.
शरमलों पुरा अन् येतां तुज सामोरा—
-तों चुम्बिलेंस तूं मज अुरिं धरुनि अुदारा !

*　　*

समअीची किञ्चित् मन्द करीं हो, बात
गा भाव गीत मृदु सुरांत करुणोदात्त !
शेवटला जातां स्वर हळुवार विरून—
पसरेल अनामिक, मधुर शान्तता येथे
हृदयांत सांठवू अनुक्त बोल तिचे ते !

— कृ. व. निकुम्ब

# परीक्षणें



**संपादनः—**

**अैतिहासिक पोवाडे खंड २ रा—** संपा० व प्रका० य. न. केळकर, पुणें. मूल्य रु. १-६-६.

श्री. यशवंत नरसिंह केळकर यांचें 'अैतिहासिक पोवाड्यां'वरील हें दुसरें पुस्तक श्रीसयाजी-साहित्यमालेंतील २८८ वें पुष्प म्हणून आज प्रसिद्ध होत आहे. त्यांचा पोवाड्यांवरील पहिला खंड प्रसिद्ध होअून आज पंधरावर वर्षें होअून गेलीं. ह्या खंडाचें साहित्य त्यांच्याजवळ तयार होतेंच. तरी-सुद्धां दोन खंडांमध्ये अितका काल गेला. तिसऱ्याहि अेका खंडाचें साहित्य सिद्ध आहे असें अैकतों. गोष्ट अशी आहे की असल्या संशोधनाच्या प्रयत्नांना जितकें अुत्साहजनक वातावरण असावें तितकें असत नाही. सर्वच व्यवहार आंतबट्ट्याचा होतो. स्वतःच्या अंगावरच करावा लागतो. संशोधनाचे श्रम करावयाचे आणि वर त्यांच्या प्रसिद्धीसाठी पदरमोडहि करावयाची. अशा निरुत्साही वातावरणां-तून केळकर ह्यांनी मार्ग काढून अैतिहासिक पोवाड्यांचा हा दुसरा खंड मराठी वाचकांच्या हवाली केला ह्याबद्दल केळकर ह्यांचें अभिनंदन करणें जरूर आहे. ह्या त्यांच्या श्रमाचें चीज करणें अर्थात् वाचकांच्या हातांत आहे.

ह्या पुस्तकांत अेकंदर सव्वीस पोवाडे अेकत्रित केले आहेत. ह्या सव्वीस पोवाड्यांत साधारण-पणें मराठ्यांच्या अितिहासापैकी पावणेदोनशे वर्षांचा काळ आला आहे. ह्या अितक्या दीर्घ कालांतील कांही विशिष्ट अैतिहासिक प्रसंग व कांही व्यक्ति यांचे अुल्लेख ह्या पोवाड्यांत आपणांस वाचावयास मिळतात. तेव्हां मर्यादित स्वरूपांत का होअीना पण मराठाशाहीचें सर्व वातावरण व तेंहि शाहीर कवींच्या प्रतिभाविलासांनी सुशोभित केलेलें असें आपणांसमोर अुभें राहतें. त्यांत शिव-कालांतील 'मोठ्या शर्तीनें भांडणारा' दत्ताजी जाधव आहे. त्यांत 'अिंग्रजांचा गर्व खर्व करणारा' सेखोजी आंग्रे आहे. त्यांत टिपू आहे. टिपूला नरम आणणारा हरिपंत आहे. परशुरामभाअू पटवर्धन आहे. त्यांत 'ब्रहस्पतिप्रमान' नाना फडणवीस आहे. अुत्तरपेशवाअींतील दुसरा कर्तबगार वीर व मुत्सद्दी महादजी शिंदे तर दोन तीन पोवाड्यांचा नायक म्हणून वावरत आहे. त्याचप्रमाणे पेशवाअी-च्या शेवटीं शेवटीं कर्दनकाळ म्हणून प्रसिद्धीस आलेला व 'करीन तर करीन छत्रपतीची मुलगीच बायको करीन' अशी शपथ घेणारा आप्पाजी देसाअी निपाणकर हाहि अेका पोवाड्याचा नायक आहे. 'शर्त करून मरणारा' डामाजी नाअीक आहे. ह्याशिवाय चिमणाबापू भोसले, रूपराम चौधरी, हरबाजीराव घुळप, जानराव धुळप, फतेसिंग व (दोन) सयाजीराव गायकवाड व तिसरा रघूजी भोसले ह्या अैतिहासिक व्यक्ति ह्या पुस्तकांत दिलेल्या पोवाड्यांत नायक म्हणून आल्या आहेत. पुरुषां-प्रमाणे स्त्रियांचा अुल्लेख आहे. सखूबाअी शिंदे, अहिल्याबाअी होळकर यांचे दोन पोवाडे आहेत. मलकोजीबुवा म्हणून अेका अवलियाचाहि पोवाडा त्यांत आला आहे. हेच प्रसंग किंवा ह्याच अैतिहासिक व्यक्ति कां निवडल्या असा प्रश्न निघणें शक्य नाही. जे कांही पोवाडे अुपलब्ध झाले ते छापले.

ह्या अैतिहासिक व्यक्ति झाल्या. ज्या शाहीरांनी आपला प्रतिभाविलास ह्या व्यक्तींवर खर्चिला त्यांचा अुल्लेख करणें जरूर आहे. मराठी शाहिरी वाङ्मयांत आपलें नांव अढळ केलेले सोलापूरचे रामजोशी (१३), पुण्याचा प्रभाकर (१४, १८, २२, २३), अनंत फंदी (२१) हे तर येथे आहेतच, परंतु त्यांच्याअितके प्रसिद्धि न पावलेले असे सुलतान (५, ६), मानसिंग (८), काशीराम (९), मल्हारी (१०), रत्नराव (११), नागनरू (१५), बापू गीरकर (१९, २०), महादु गोविंदा (२४), निंबाजी (२५), शिवनाथराय (२६) ह्यांनी सर्वांनी आपआपल्या आश्रयदात्यांचें गुणगान मोठ्या कौतुकाने व कवित्वाने केलें आहे. ह्या सर्वांत अग्रसर असा शिवकालीन शाहीर 'अज्ञान यमाजी' हा तर आहेच. अशा रीतीने त्या दोनशे वर्षांच्या कालखंडांतील कांही प्रसिद्ध व अप्रसिद्ध अशा जान-

पदकवींचें जानपदकाव्य व दोनशें वर्षांतील जानपदभाषा ह्या पुस्तकांत अुपलब्ध करून दिल्याबद्दल संग्राहक केळकर ह्यांना मराठीचे वाङ्मयाभ्यासक धन्यवादच देतील.

आणखी अेका दृष्टीने श्री. यशवंतरावजी केळकर ह्यांचें अभिनंदन करणें जरूर आहे. आणि तें ह्या पोवाड्यांच्या संपादनाबद्दल व त्यांवरील परिष्काराबद्दल. संपादन व परिष्कार ह्या दोन्ही गोष्टी मोठ्या चिकित्सेने, बारकाव्याने, आस्थेने व हौशीने केल्या आहेत. अितिहाससंशोधनास जरूर असणारी सूक्ष्म दृष्टि, तें संशोधन अजमाविण्यास लागणारा निःपक्षपातीपणा, त्यांतील माहिती व त्यांचा काल निश्चित करण्यास लागणारा अचूकपणा ह्या बाबी केळकरांच्या जवळ पुरेपूर आहेत. ह्याच बाबी ह्या पुस्तकांच्या विशेष होत. कै. वासुदेवशास्त्री खरे ह्यांच्या परंपरेंत तयार झाल्यामुळे ह्या गोष्टी त्यांना प्राप्त झाल्या होत्या. त्या परंपरेंतील यशवंतरावजी हे तिसरी पिढी होत. खरे यांची पहिली पिढी, तात्यासाहेब केळकरांची दुसरी पिढी व यशवंतराव हे तिसरी. तेव्हा त्यांच्या संपादनांत ह्या गोष्टी आढळणें हें स्वाभाविक आहे. त्याचें प्रत्यंतर केळकरांच्या अितर ग्रंथांत थोड्याबहुत प्रमाणानें मिळतें. तें ह्या ग्रंथांत पदोपदीं आढळून येतें. पोवाड्यांतील अैतिहासिक माहिती पडताळून पाहण्यासाठी व तिची सत्यता सिद्ध करण्यासाठी मराठी, अिंग्रजी, पोर्तुगीज, फार्सी व अितर भाषांत विखुरलेलीं साधनें ठिकठिकाणीं दिलीं आहेत. पोवाड्यांतील अर्थ स्पष्ट करण्यासाठी तेच परिश्रम दृष्टीस पडतात. कोठेहि प्रयत्नाची कसूर केली नाही. जेथे अर्थ लागला नाही तेथें संशय प्रकट केला आहे. अगोदरच हीं ग्रामीण गीतें, तींहि पुनः अडाणी लेखकांनीं नकललेलीं, अडाणी शाहीरांनी गायिलेलीं, गोंधळ्यांनी म्हटलेलीं अशी त्यांची अवस्था असल्यामुळे त्यांत संशयस्थलें पुष्कळ राहावींत ह्यांत आश्चर्य नाही. आमची तक्रार अुलट ही आहे की अैतिहासिक परिष्कार वाजवीपेक्षा अधिक झाला आहे. चिकित्सा अधिक झाली आहे व त्यामुळे कांही हास्यकारक प्रकार संपादकांच्या हातून झाले आहेत. पाठभेद व मोडी वाचनांतीले चुका दाखवितांना कल्पना किती चालवायची ह्याला कांही मर्यादा असावी की नाही? पाठभेद द्यावयाचे, पण त्याला दुसऱ्या अुपलब्ध प्रतींचा किंवा संहितांचा आधार असावा लागतो. कल्पनेनेहि कांही वेळां पाठभेद सुचवावे लागतात, पण त्याला अर्थैक्याची मर्यादा पाळावी लागते. ह्या दोन्ही गोष्टी संपादकाच्या नजरेंतून सुटल्याचीं अुदाहरणें ह्या संपादनांत आढळतात. संहितासंपादन हें सुद्धा अेक शास्त्र आहे. तें केवळ कल्पनेचें राज्य नव्हे. ह्या ग्रामीण भाषेंतील वाङ्मयाच्या बाबतींत तर त्या शास्त्राची फार जरूरी आहे.

हा झाला अैतिहासिक व भाषिक परिष्कार. अैतिहासिक परिष्कार समाधानकारक आहे. तसा व तितका भाषिक परिष्कार नाही. तो आणखी जास्त हवा होता. परंतु आमची तक्रार त्यासंबंधीहि नाही. तो कमी असला तरी त्याने काम भागतें. पुस्तकांत जी अुणीव आहे ती वाङ्मयीन परिष्कारा-बाबत. त्याचा पुस्तकांत कोठे मागमूसहि नाही. हे पोवाडे आहेत. हें काव्य आहे व तेंहि भावकाव्य आहे. हीं सर्व भावगीतें आहेत, व त्या दृष्टीने त्यांत भावनांचें अुत्कटत्व व अेकपिण्डत्व आहे. त्यांत पुरुषार्थाच्या अेका प्रबल भावनेचा आविष्कार आहे. स्वत्व, स्वजन, स्वपराक्रम, स्व-राज्य अित्यादीं-वर आधारलेल्या वीररसाचा हा आविष्कार आहे. तेव्हा त्या दृष्टीने ह्या भावकाव्याचा विचार करणें अगदी अगत्याचें होतें. केळकर ह्यांना पोवाड्यांच्या ह्या स्वरूपाची कांही कल्पनाच नाही असें दिसतें. केळकर हे स्वतः कवि आहेत. 'गीतद्विदलां'तील अेक दल त्यांनी प्रफुल्लित केलें आहे. कदाचित् ते अव्वल प्रतिभेचे कवि नसतील, पण कवि आहेत. त्यांच्यापासून ही आमची अपेक्षा होती. ते प्रथमच मुळी ह्या पोवाड्यांना काव्यमय अितिहास समजतात. हा मुळांतच आमच्या मतें दृष्टिभ्रम आहे. पोवाडे हें 'अितिहासमय काव्य' आहे, 'काव्यमय अितिहास' नव्हे हें आमचें म्हणणें आहे. शाहीर हे प्रथम कवि आहेत; नंतर ते असलेच तर अितिहासकार आहेत. स्वजनांच्या परा-क्रमाचा अितिहास सांगायचा हें त्यांचें प्रधान अुद्दिष्ट नव्हे; त्यांच्या पराक्रमांचें कवन गावयाचें हें प्रधान अुद्दिष्ट आहे. कोणीहि अितिहासकार आपल्या अैतिहासिक विवेचनाला किंवा विधानाला

पोवाड्यांतील पंक्तीचा आधार देत नाही. पोवाडे हे अव्वल दर्जाचीं राजकीय अितिहासाचीं साधनें नव्हत. असलींच तर तीं दुय्यम किंवा तिय्यम दर्जाचीं साधनें होत. कारण अितिहास हा होतां होअील तितका सत्याचा आविष्कार असतो व पोवाडे हें काव्य असल्यामुळे व कल्पनेला त्यांत वाव असल्यामुळे त्यांत सत्याभासाचा आविष्कार असतो. म्हणूनच आम्ही म्हणतों की पोवाड्यांच्या ह्या संपादनांत वाङ्मयीन परिष्काराची जरूरी होती. तो तसा नसल्यामुळे पुस्तकांत अेक वैगुण्य राहून गेलें. बरें, ह्या असल्या वाङ्मयीन परिष्काराला साहित्यहि ह्या पोवाड्यांत भरपूर होतें. रामजोशी, प्रभाकर, अनंतफंदी ह्यांचे पोवाडे तर भावकाव्याचे अुत्तम नमुने आहेतच; पण नाना फडणविसांचा, सेखोजी आंग्र्यांचा, पेशव्यांच्या शुक्रवार वाड्याचा, डामाजी नाअिकाचा अित्यादि पोवाडेहि भावकाव्याचे अुत्तम नमुने आहेत. डामाजी नाअिकाचा पोवाडा तर भावनेचा अुच बिंदु गांठतो. तेव्हा ह्या अस्सल जानपद काव्यांतील भावनोत्कर्ष व प्रतिभावैभव स्पष्ट करून दाखविणें जरूर होतें. वाचकांनी हे पोवाडे अवश्य वाचावेत म्हणजे आमच्या आग्रहाचें प्रत्यंतर मिळेल. त्यांच्यांतील अैतिहासिक सत्यता आपल्या विचिकित्सेने तावून सुलाखण्याअैवजी जर केळकर ह्यांनी त्यांतील काव्यात्मता सुलाखिली असती तर बरें झालें असतें अितकेंच आमचें म्हणणें.

संपादनांत आणखी अेक दोष राहून गेला असें वाटतें. दोष मामुली आहे. त्याला विशेष महत्त्व आहे असें नाही. संपादनात पोवाड्यांचा कालानुक्रम साधला नाही. शिवकालीन दत्ताजी जाधवाचा पोवाडा प्रथम आहे हें खरें आहे; परंतु पुढील पोवाडे कालाच्या दृष्टीने किंचित् पुढेमागे झाले आहेत. कालानुक्रम शाहीरांच्या कालाप्रमाणे ठरविणें किंवा वर्ण्य प्रसंगांच्या कालाप्रमाणें ठरविणें शक्य आहे. शाहीरांचा निश्चित काल अुपलब्ध नाही. तेव्हा दुसराच मार्ग तेवढा अुरतो. तोहि येथे अवलंबिला नाही. अकीवाटचा प्रसंग (८) हा १७७७ मधील आहे, परंतु तो टिपूच्या प्रसंगानंतर म्हणजे १७९० नंतर दिला आहे, तसेंच आप्पा देसाअी ह्याचा प्रसंग १८०८ मधील असून सोलापूरच्या (१८१८) नंतर दिला आहे अहिल्याबाअीचा पोवाडा असाच योग्य क्रमांत दिला गेला नाही. डामाजी नाइकाचा पोवाडा असाच कालानुक्रम भंग करतो, तीच गोष्ट अितर कांही पोवाड्यांची. कालव्युत्क्रम ठिकठिकाणीं झाल्यामुळे अैतिहासिक माहिती सलग रीतीने पुढे अुभी राहण्यास अडथळा होतो. छापतांना थोडी काळजी घेतली असती तर हें टळलें असतें.

अशीच दुसरी अेक गोष्ट किंचित् गैर दिसते. तरी पण ती केळकरांच्या पोवाड्यांवरील पहिल्या खंडापेक्षा पुष्कळच कमी आहे. हीं गोष्ट पोवाड्यांचें पूर्वी ज्यानी कोणीं संपादन केलें आहे त्यांच्यासंबंधी अुद्गारांची होय. हे अुद्गार (पृ. २, ३०, ३१, १४७) जरा कडक आहेत. पोवाड्यांचें संपादन शितूत, अॅक्वर्थ व शाळिग्राम, भावे, राजवाडे वगैरेंनी केलें. त्यांनी केलें त्याला आज पुष्कळ काळ होअून गेला. त्यांचा बिचाऱ्यांचा काय दोष? आज जशीं साधनें अुपलब्ध आहेत तशीं त्यांच्या वेळीं नव्हतीं. त्यांच्या चुका आहेत. त्या दाखवा परंतु त्यांनी केलेल्या कामाचें श्रेय त्यांच्या पदरांत टाका. ह्या ग्रामीण काव्याचें संपादन कठीणच आहे. खुद्द केळकर ह्यांनाहि त्याची कल्पना असलीच पाहिजे. कांही थोडे अपप्रयोगहि आढळतात. 'नांवावर कुरवोडी', 'बाजीरावाच्या वल्गना' (पृ. ८२) वगैरे प्रयोग खटकतात.

ह्या पुस्तकांतील संपादनाबद्दल संपादकांना धन्यवाद आम्हीं वर दिलेच आहेत. पोवाडे मिळविणें, ते नकलणें, त्यांतील कठीण शब्दांचा अर्थ देणें, पाठभेद ठरविणें, व सुचविणें, मोडी वाचनांतील चुका अनुमानणें, अैतिहासिक प्रसंग निश्चित करणें, त्यांच्या तारखांचा मेळ घालणें, त्यांना अितर विखुरलेल्या साधनांचा पुरावा देअून सिद्ध करणें ह्या सर्व गोष्टी मोठ्या चिकाटीने केळकर ह्यांनी केल्या आहेत.

मराठ्यांचा राजकीय अितिहास पुष्कळ लिहितात. धार्मिक व सामाजिकहि अितिहास पुष्कळ लिहितात. परंतु वाङ्मयीन अितिहासाकडे कोणाचें विशेष लक्ष जात नाही. त्यांतहि पुनः ह्या जानपद भावकाव्याकडे तर कोणाचेंच लक्ष जावें तसें जात नाही. यशवंतराव केळकरांनी हें अुपेक्षिलेलें दालन

अनुक्रमणिका

चांगल्या सोपस्कारानें सुशोभित केल्याबद्दल वाङ्मयाभ्यासक त्यांचे केव्हांहि ऋणी राहतील. खरे शास्त्र्यांनी प्रस्तावना लिहिल्या व पटवर्धनी दप्तर संशोधिलें. तात्यासाहेब केळकरांनी 'मराठे व अिंग्रज' ला प्रस्तावना लिहून अैतिहासिक 'सिद्धांतना'चा अुपक्रम केला. त्याच परंपरेंतील ह्या केळकरांनी आपला संशोधन व संपादन ह्यासंबंधी अुद्योग चालविला आहे हें वैयक्तिकदृष्ट्या त्यांना जसें भूषणावह आहे तसें त्या परंपरेलाहि आहे. पुनः अेकदा केळकर ह्यांचें ग्रंथाबद्दल अभिनंदन करतों.

कृ. पां. कुलकर्णी

## काव्यः—

**भावपूर्णा**— कवि श्री. रा. अ. काळेले; प्रका० त्रिं. अ. मांईणकर, ११ शिमली बाजार, अिन्दूर; मूल्य रु. १।.

**प्रतिपदा**— कवि श्री. गो. म. वाटवे; प्रका० 'बलवंत प्रकाशन', १७२४ रामदेव रस्ता, बेळगांव; मूल्य रु. १।.

केशवसुतांच्या नंतर मराठी काव्यांत तेजाची पूजा करणाऱ्यांचा भासलेला अभाव गेल्या कांही वर्षांत भरून निघालेला दिसतो. स्वा. सावरकर-गोविंद वगैरे कवींची विशिष्ट प्रकारची काव्यरचना सोडली तर हें पुनरुज्जीवन करण्याचें काम श्री. कुसुमाग्रजांच्या 'विशाखे'नें केलें असें म्हणतां येअील, आणि प्रस्तुत काव्यसंग्रह 'भावपूर्णा' यामध्येही हीच प्रकाशपूजा चालू असल्याचें आढळून येतें ही मोठी समाधानाची गोष्ट आहे. अर्थातच या पूजेला लागणारें वातावरण अंदी आणि गंदी किंवा शान्त, निवान्त आणि केन्द्रित असून चालणार नाही—नव्हे, खरें विकसनशील जीवन अशा ठशाचें असूंच शकत नाही. त्यांत नेहमी क्षोभ आणि चळवळ हवी, प्रतिकार व जिवंतपणा पाहिजे, मानवाची सारखी चाललेली धडपड त्यांत पडछायेप्रमाणे दिसावयास पाहिजे. कवि म्हणतात त्याप्रमाणे 'काव्याच्या विषयाचा प्रांत अत्यंत विस्तीर्ण आहे'; आणि तो वरील स्वरूपाचा आहे. 'तेज भरलें भरलें' या कवितेंत कवीला हें तेजाचें दर्शन झालें आहे. 'झळझळीत सोनेरी तेजाचें तारूं क्षितिजाच्या पल्याडून वरती येत आहे, तेव्हा लोकहो, दारें-गवाक्षें मुक्त करा, या विश्वंभर तेजाला घरभर पसरूं द्या—अुजाडलें' असें कवि सांगत आहेत. मात्र जीवन असें नेहमीच तेजानें भरलेलें असणार नाही, पण कुठें तरी 'लहान तेजाळ ठिणगी' फुंकेची वाट पाहत असते, त्यालाहि अुद्देशून कवि म्हणतात—'चेतवा अग्नीला फुंकून स्वप्राण । साक्षात् प्रकटूं या देव हुताशन' ('फुंकर'), तरीहि कांही वेळां अंधारून येतें, 'पैशाच, काळेंकुट्ट वस्त्र' मेदिनी ल्यालेली असते, त्या वेळीं सौदामिनी 'तेजस्विनीस' कवि विनवीत आहे—

> चैतन्य जें, अुत्कर्ष जें । सामर्थ्य जें, स्वातन्त्र्य जें ।
> त्वत्तेज तें विद्युल्लते । माझ्यामध्ये दे चेतुनी ॥

अशा कवितांतून स्फुरित होणारें कवींचें जीवनविषयक दर्शन 'चंद्र-मंगळ', 'वणव्यापूर्वी' व 'मानवता' या काव्यांत विशेषत्वाने स्पष्ट होतें. येथे 'विशाखे'मधील कवितांची आठवण झाल्यावाचून राहत नाही. सावरकरांची 'मूर्ति दुजी ती' किंवा कुसुमाग्रजांची 'अहिनकुल' यांमधील विरोधदर्शनाप्रमाणे या कवितांतील विरोधोक्ति आंतील ओजस्वितेमुळे मनाला चटका लावून सोडणारी झाली आहे. खालील अुताऱ्यांवरून थोडीशी तरी कल्पना येअील. 'चंद्र-मंगळ' कसे आहेत ?

> 'अेकांत सांठली निर्मळ चंदेरी शीतळ शान्तता,
> स्वप्नाळु माधुरी
> दुसऱ्यांत आहे रणकन्दनाचा भीषण रक्तिमा,
> आसुरी लालसा—अन् जगज्जिगीषा !...
> हा अेक जणू मूर्तिमंत हास्य हिमाद्रिकन्येचें ।
> तर तो रुद्राचा तृतीय नयन— निखाऱ्यासारखा'

'मानवते'मध्ये स्वर्गस्थ देवांना अुद्देशून कवि आवाहन करीत आहे—

'स्वर्गस्थांनो ! त्या स्वर्गाचा कसा येअिना कंटाळा ?
कल्पवृक्षाच्या छायेंत, आकल्पान्त सुषुप्तींत—
सोसतां कां निष्कामशा शाश्वततेचें हें ओझें ?
कसें भोगीत पडलां थडग्यांचें चिरसौख्य ?
तुम्ही निष्काम निष्क्रिय,
तुम्हा माहीत कोठून युयुत्सेचा हर्षोन्माद।
......टाकून द्या देवपण
या हो मानव होअून येथे कर्मभूमीवर.'

त्याचप्रमाणे 'माळरान'मधील युयुत्सु दलितांविषयीची स्नेहभावना, 'अुद्धार'मधील प्राण्याच्या तीन अवस्थांवरील वेधक रूपकातिशयोक्ति (allegory), 'अंकुर मी सान'मधील विनीत तेजोपासना, 'वळवाचा पाअूस'मधील गूढरम्य हळहळ हीं कुणालाहि आनंद देतील अशाच रीतीने व्यक्त झालीं आहेत.

या तेजोपासनेप्रमाणेच या संग्रहांत प्रेमोपासनाहि केलेली आढळते. हीं गीतें रचनेच्या दृष्टीने अुत्तम आहेत. पण विशेषशीं 'भावपूर्ण' म्हणतां अेणार नाहीत. यांतील थाट माधवजूलियनी 'अिराणी सुरअी'चा आहे, पण आंतील 'अिरा' मात्र 'फारशी' चवीने चवदारहि बनली नाही व मादक तर नाहीच नाही. 'वाट किती पाहूं', 'मुशाफिरींतली भेट' अशा कांही कवितांत किंचित् रुचिपालट आहे म्हणूनच त्या वाचाव्याशा वाटतात. पण रचनेंत मात्र याच विभागांतील कविता पहिल्या विभागांतील कवितांपेक्षा अधिक सरस आहेत. पहिल्यांत मुक्तच्छंदीय आवेग आहे, पण खडबडीत-पणा आलेला नाही, ओजस् आहे, पण सफाअी नाही. दुसऱ्यांत शैलीची प्रसन्नता आहे, पण भाव-नेची अुब कमीच आहे.

अेका बाबतींत मात्र कवीच्या सौन्दर्यान्वेषी वृत्तीशीं किंचित् विसंगत वाटणारी गोष्ट दिसून येते. कवीचें मन मानवतेशीं सहानुभूति दर्शविणारें आहे; व त्यामुळेच जेथे जेथे सत्य व न्याय, समता नि बंधुता यांना विरोधी गोष्टी आढळतील तेथे तेथे यांच्या ओजस्वी वाणीने किरणशलाका फेंकली आहे. हे विरोध जेथे खरोखरच मानव्यद्रोही, अन्यायमूलक व म्हणून अुद्वेगकारी असतील तेथे कवींची तीक्ष्ण नजर जावी व त्यांचा त्यांनी दंभस्फोट करावा हें योग्यच आहे. पण असेहि कांही प्रसंग या कवितांतून दिसतात की जेथे वरीलपैकीं क्वचित्च कांही असेल. तरीहि कवीने त्यांचा अुपयोग विरोधाभास अलंकारासाठी केला आहे. त्यांतहि विशेष अनुचित हें की कवि सौंदर्याला 'काव्याचा निकष मानीत असूनहि त्यांच्या काव्यांत बरोबर त्याच सौन्दर्यगुणांनी युक्त अशा गोष्टींचा अधिक्षेप ध्वनित केला गेला आहे. 'दोन घडणारे', 'दोन दीप' व 'माळरान' या कवितांत हें खास आढळतें. दगडांतून खडी घडवणारा चांगलाच पण मूर्ति घडवणारा कां वाअीट ? अन्तराळांतला विद्युद्दीप मोठाच, तरी मन्दिरांतला क्षीण दिवा कां तुच्छ ? माळरानावरचें झाड खंबीरच, परंतु कुंडींतील फुलझाड मात्र कींव करण्यासारखेंच कां ? गोंडस मूर्ति, शान्त नन्दादीप आणि डौल-दार फुलझाड यांना कवींच्या "विस्तीर्ण प्रांतांत' जागाच मिळूं नये ही गोष्ट खास स्पृहणीय नाही. शिवाय यांत 'सौन्दर्याचा निकष' कसा काय लावला गेला तेंहि समजत नाही; अुलट सौन्दर्याचा अधिक्षेपच सुचविला गेला असल्याचा संशय दृढ होतो. विरोधदर्शन परिणामकारक होतें म्हणून तो अशा तऱ्हेने मुद्दाम शोधीत बसणें कदाचित् 'पुरोगामित्वा'चें लक्षण ठरेल, पण 'साहित्या'चें मात्र नक्की नाही. कदाचित् कवि या गोष्टींकडे अुपयोगितेच्या दृष्टीने पाहत असावेत व त्यांना त्या अैदी, निरुपयोगीपणाच्या द्योतक वाटल्या असाव्या. तसें असेल तर त्या अनुभूतीचें हें काव्यगत प्रकटीकरण तशा भावनेला पोषक झालेलें दिसत नाही, अुलट सौन्दर्यदर्शनाला अपकारक झालेंसें वाटतें. त्यामुळे कवि अवश्य मानीत असलेली 'हृद्यता' दूषित होत आहे असें मनाला वाटल्या-वाचून राहत नाही. तेव्हा "सौन्दर्य हा पदार्थ अगदी निरुपयोगी ठरून त्याअैवजी जीवनास मान्यता

मिळाली आहे" अशा तऱ्हेची रूढ गैरसमजूत स्पष्ट करतांना त्यांनी जें म्हटलें आहे तें या ठिकाणीं लावून पाहातें म्हणजे येथील हेत्वाभासहि त्यांचे ध्यानांत चटकन् येईल.

"प्रतिपदा"— बेळगांवचे तरुण कवि श्री. गो. म. वाटवे यांचा हा पहिला स्फुट कविता संग्रह आहे. कवि स्वतःच म्हणतात त्याप्रमाणे ते "काव्यप्रांतांत प्रथमच पाऊल टाकणारे नवशिके तरुण" आहेत, आणि या 'नवशिकेपणा'च्या खुणा प्रस्तुत संग्रहांत जशा जागोजागी आढळतात तशाच 'तारुण्याच्या' प्रेमशौर्याच्या भावनाहि यांत चांगल्या प्रमाणांत दृग्गोचर होतात. फारच थोड्या प्रणयी कवींच्या जीवनांत आढळणारी प्रेमयोगी कृतकार्यता प्रस्तुत कवीच्या जीवनांत आहे. परंतु आनंदाची गोष्ट ही की त्यामुळे ते सुस्त बनलेले नाहीत. प्रणयाच्या बहुतेक छटा त्यांच्या काव्यांत उमटल्या आहेत. 'कृतज्ञतें'त प्रीतीची भूक, 'विसरावें तुजला'मध्ये चराचराचे ठायीं प्रणयिनीदर्शन, 'अंत न पाहि'मधील आर्त हाक, 'विनवणी' व 'दिन भाग्याचा' यातील स्नेहज विषाद, अित्यादि प्रकारें त्यांनी आळवणी केल्यावर शेवटीं सौख्यपूर्ण असा विवाहबद्ध होण्याचा 'तो क्षण' त्यांना लाभला. तरीहि लोक त्यांच्या प्रेमाला नावें ठेवीत आहेत हें पाहून कवि बेफाम होतो आणि 'व्हा दूर'मध्ये म्हणतो की आम्हां दोघांची अेकमेकांवर प्रीति आहे, व मी तिचा कांत आणि धर्मपति आहे, मग मजवर आता कां टीका ? 'व्हा दूर अता, मज रोखुं नका। भी कांतेच्या मीलना भुका॥' संग्रहाच्या प्रथमार्धांतील ह्या प्रेमकवितांत स्वानुभूतीचा जिव्हाळा असल्यामुळे त्यांत हृद्यता आहे. परंतु ज्या 'रविकिरणमंडळा'चा आदर्श त्यांचेपुढे आहे त्याच्या सदस्य कवींमधील प्रसन्न रचना मात्र त्यांना अजून साधली नाही. 'आशीर्वाद' देतांना कवि गिरीशांनी म्हटल्याप्रमाणे "कवीच्या प्रतिभेला अजून तपश्चर्येची जोड हवी आहे."

राष्ट्रभक्तिपर कवितांत तीनचार कविता नांव घेण्यासारख्या झाल्या आहेत. 'तळमळ,' 'अेक वर्षानंतर,' 'गुलामाचें गाणें,' 'कां लढा हा संपला' या कवितांत कवीची राष्ट्रस्वातंत्र्याची तळमळ दिसून येते. आपल्या हुतात्मा बांधवांप्रमाणे आपणहि 'प्रीति वा थोर कीर्तीनें अडविलें' न जातां, 'सकल सुखदा प्रीतिच्या बंधनाही तोडोनियां' आओच्या मुक्तीसाठी धावून जावें असें त्यास (मनांतल्या मनांत) कळत आहे, पण वळत नाही ! म्हणून 'आस' या सुंदर कवितेंत कवि म्हणतात :

तुझ्या स्तवें कधीं न मीं देहदंड सोशिला,
झुंजलों न तोडण्या त्वदीय दास्यशृंखला—
माअुली त्वदंकिं मी खेळलों नि वाढलों,
कृतघ्न मी ! कृतघ्न मी ! देह मात्र वाढला !

आजचें सर्वच साहित्यजगत् वाग्वीरांनी भरलेलें आहे; काव्यांत ग्रथित केलेल्या विचारांना मूर्त रूप देण्यासाठी करावा लागणारा त्याग व त्याला अवश्य असणारी ध्येयावरील श्रद्धा बहुतेकांत नाही. प्रत्यक्ष कार्याच्या अभावीं निदान सत्कर्माला विरोध न करितां काव्यद्वारा कार्यकर्त्यांना मदत करीत राहिलों तरीहि आपली कामगिरी मातृभूच्या पायाशीं रुजू होओलच. कवि गोविन्दांप्रमाणे मनांतील तळमळ मात्र अभङ्ग राहावी म्हणजे कांहीतरी साधल्याचें श्रेय आपल्याला मिळेल.

ना. ग. जोशी

## लघुकथा :—

(१) **व्याधाची चांदणी**— ले० प्र. पाध्ये; प्रका० रामकृष्ण प्रकाशन मंडळ, मुंबओ नं.४; मूल्य रु. २॥.

(२) **आनीतेचें दिव्य**— ले० लक्ष्मणराव सरदेसाओ; सागर साहित्य प्रकाशन, मुंबओ; मूल्य रु. १।.

(३) **तोंडचा घास**— ले० शांतिलाल भंडारी; प्रका० महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर; मूल्य रु. १॥।.

(४) विद्युत्-रेखा— ले० मालतीबाओी दांडेकर; प्रका० महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर; मूल्य रु. १॥

'व्याधाची चांदणी' हा प्रभाकर पाध्यांचा पहिला लघुकथासंग्रह. आतापर्यंत राजकीय टीकात्मक लेख व कलाविषयक चर्चात्मक लेख लिहून त्यांनी त्या प्रांतांत चांगलेंच नांव कमावलें आहे. आता या लघुकथासंग्रहानें 'यशस्वी लघुकथालेखक' म्हणून त्यांनी कथादालनांत पाअूल टाकलें आहे असें म्हटलें तर मुळीच चुकणार नाही. या त्यांच्या पहिल्याच लघुकथासंग्रहांत दिसून येणारा भाषेचा ठसठशीतपणा, अनुभवाचा व्यापकपणा व वातावरणनिर्मितीचें कौशल्य पाहिलें तर नामवंत लघुकथालेखकांच्या मालिकेंत प्रभाकर पाध्ये लवकरच येअून बसतील याविषयीं शंका वाटत नाही.

त्यांच्या या बारा लघुकथांतून त्यांनी वाचकांना दिवाणाच्या दिवाणखान्यापासून ते आफ्रिकेच्या पश्चिमवाळवंटापर्यंत सगळीकडे फिरवून आणलें आहे, कोंकणांतील देवदेवस्कींपासून ते श्रीनिवासाच्या विचित्र मित्रप्रेमापर्यंत विविध अनुभव वाचकांपुढे ठेवले आहेत व सुंदराबाअीसारख्या अेका माविणीपासून ते सुमनसारख्या अेका निरागस बालिकेपर्यंत निरनिराळीं व्यक्तिचित्रें कोमल हातानें रंगविलीं आहेत. या त्यांच्या विविधतेंत निराळेपणा आहे— अपवादात्मक निराळेपणा आहे— हें मात्र लघुकथा वाचतांना सहज दिसून येतें. शेंजाऱ्याकडे अभिलाषपूर्ण दृष्टीनें पाहणारी सुमनची आअी, पतीच्या मित्रावर प्रेम करणारी व त्याच्याकरिता झुरून मरणारी कालिंदी— स्वतःची पत्नी ही आपल्या व आपल्या जीवामावाच्या मित्राच्या जीवनाची समाअीक वांटेकरी व्हावी अशी अिच्छा करणारा श्रीनिवास व मोलकरिणीशीं प्रेमाचे खेळ खेळणारा कॉलेजांतील रंगेल नायक— या साऱ्या व्यक्ति जीवनांत सांपडतात, नाहीं असें नाहीं; पण अशा व्यक्ति अपवादात्मकच असतात हेंहि तितकेंच खरें. स्त्रीपुरुषविषयक असे अनैतिक प्रणयप्रसंग वाङ्मयांत आणणें अिष्ट का अनिष्ट हा प्रश्न विवाद्य म्हणून सोडून दिला तरी हे प्रसंग समाजाचे प्रातिनिधिक म्हणून रंगविणें तितकेंच चुकीचें ठरेल.

वातावरणनिर्मितीचें कौशल्य 'स्मृतिपूजा' व 'सायंकाळच्या सावल्या' या दोन लघुकथांत अतिशय चांगल्या रीतीनें दिसून येतें. 'स्मृतिपूजे'मधील काकांच्या स्वप्नांतील महापुरुषाचें वर्णन व 'सायंकालच्या सावल्या'मधील बाळकृष्णाच्या मनांतील आशानिराशेच्या द्वंद्वाचें वर्णन अत्यंत परिणामकारक आहे. मराठीमध्ये रसपरिपोषक वातावरण यशस्वी रीतीनें निर्माण करणाऱ्या फार थोड्या लघुकथांत या कथांचा अन्तर्भाव होअील हें निश्चित. याशिवाय 'यात्रेची रात्र', 'देवगाअीचा पाय', 'व्याधाची चांदणी' अित्यादि लघुकथांतील वर्णनें लेखकाच्या निरीक्षणशक्तीची चांगली साक्ष देतात.

स्वभावरेखनाच्या दृष्टीनें देखील त्यांच्या लघुकथा अत्यंत सरस वठल्या आहेत. कुंचलीच्या तीन चार फटकाऱ्यांत व्यक्तीचें चित्र समोर अुभें करणाऱ्या चित्रकाराचें सामर्थ्य त्यांच्या लेखणींत आहेच; पण त्याशिवाय त्यांच्या मनोव्यापाराचे सूक्ष्म धागेदोरे नाजूक हातानें उकलून त्या व्यक्तींच्या पार्थिव स्वरूपाबरोबर त्यांच्या मानसिक खळबळीचें प्रतिबिंबसुद्धा त्यांनी मोठ्या कलापूर्ण रीतीनें लघुकथांतून पाडलें आहे. 'यात्रेतील रात्र'मधील सुंदराबाअी, 'व्याधाची चांदणी'मधील पार्वती, 'अुस्कटलेलें घरटें'मधील सुमन व 'देवगाअीचा पाय'मधील दिवाण या व्यक्ति यशस्वी स्वभावदर्शनाचे नमुने म्हणून दाखवितां येतील.

पण तंत्रदृष्ट्या मात्र त्यांच्या लघुकथा बऱ्याचशा विस्कळित आहेत. पुष्कळ लघुकथांतून कथानकाचें बीज प्रभावी नाही, त्यामुळें त्याभोंवती फिरणारें कथानक तितकेंच दुर्बळ झाल्यामुळे वाचकांची अुत्कंठा तें वाढवूं शकत नाही. 'नजरभेट', दिलरुबा' या गोष्टी अशा कथानकांचीं अुदाहरणें म्हणून दाखवितां येतील. 'देवगाअीचा पाय', 'अपहार', 'व्याधाची चांदणी' यांतील समरप्रसंग परिणामकारक आहेत पण त्यांची रचना विस्कळित वाटते. पाल्हाळामुळे समरप्रसंगाची तीव्रता बरीच कमी होते. मात्र विस्मयजनक शेवट म्हणून 'यात्रेची रात्र', शेवटचा रुपया', अपहार' व 'सायंकाळच्या सावल्या' या चार गोष्टी अुल्लेखनीय वाटतात. पण तंत्रबद्ध रेखीवता नसूनहि मार्मिक स्वभावदर्शन व

यशस्वी वातावरणनिर्मिति यांमुळे 'उस्कटलेलें घरटें', 'सायंकाळच्या सावल्या' व 'व्याधाची चांदणी' या लघुकथा परिणामाच्या दृष्टीनें प्रभावी झाल्या आहेत.

थोडक्यांत म्हणजे या कथासंग्रहानें प्रभाकर पाध्ये यांनी लघुकथादालनांत आपलें स्वतंत्र स्थान निश्चित करून ठेवलें आहे.

'आनीतेचें दिव्य' हा प्रा. लक्ष्मणराव सरदेसाई यांचा पांचवा लघुकथासंग्रह. प्रादेशिक वातावरण निर्माण करून गोमांतकीय रम्य सौंदर्य त्यांनी आतापर्यंत प्रसिद्ध झालेल्या चार लघुकथासंग्रहांतून मोठ्या रम्यतेनें खेळवलें आहे. त्यांचा हा लघुकथासंग्रह त्यांच्या आजवरच्या कीर्तीत भर घालील असाच आहे. त्यांनी एकंदर नऊ कथांतून व्यक्तींच्या जीवनांतील मोहाचे वा अधःपाताचे प्रसंग अत्यंत कलापूर्ण रीतीनें चित्रित केले आहेत, व ते करतांना मोहांत सांपडलेल्या किंवा अधःपात झालेल्यांविषयीं वाचकांच्या मनांत सहानुभूति वाटेल अशी काळजी त्यांनी घेतली आहे. यशस्वी स्वभावदर्शनाची हीच खरी कसोटी होय. आपल्या प्रियकराच्या प्रेमासाठीं जवळ जवळ नग्नावस्थेंत मस्तकावर दगड घेऊन सर्व लोकांच्या देखत बांधकाम चाललेल्या अिमारतीला लावलेल्या तीन शिड्या बेडरपणें चढून जाणारी व आपल्या प्रियकराच्या प्रेमाचें पार्थिव स्वरूप कळून आल्यावर तितक्याच निःशंकपणें तिसऱ्या मजल्यावरून स्वतःचा देह खालीं झोकून देणारी आनीता जितकी आपणांला आकर्षक वाटते, तितकाच सख्खर– स्वतःच्या बायकोवर– अत्याचार करण्याचा प्रयत्न केला म्हणून परिणामाची कदर न बाळगतां बेगुमानपणें राण्याच्या मुलाचा खून करणारा नागूहि आपणांला प्रिय वाटतो. अजाणतेपणानें व दुबळेपणानें गौरीहराच्या जाळ्यांत सांपडल्यानें लग्नानंतर आत्महत्या करणाऱ्या लीलेविषयीं जितकी सहानुभूति वाटते तितकीच दारिद्र्यामुळे स्वतःच्या मुलासाठीं आपलें शील अेका श्रीमंताला विकणाऱ्या मंगेश देशपांड्याच्या आओविषयींहि सहानुभूति वाटूं लागते. मात्र त्या श्रीमंताचा सूड म्हणून सभ्यता व नीति यांच्या साऱ्याच कल्पना ओलांडणाऱ्या मंगेश देशपांडे याचें चित्र थोडेसें अतिरंजित वाटतें. त्याचप्रमाणें अति विचित्र अट घालून आनीतेचें दिव्य पाहणाऱ्या व तिच्या त्या दिव्याची चेष्टा करणाऱ्या आंतोनचें चित्रहि कांहींसें अस्वाभाविक झालें आहे. पण असे खडे मधून मधून थोडेसेच लागतात.

'अपूर्णतेंतील सुख', 'मीच तिला मारलं' व 'बळी' या तीन लघुकथांखेरीज अितर कथांतून स्त्रीपुरुषांचे अनैतिक संबंधच कथानकांचीं बीजें म्हणून निवडण्यांत आले आहेत. पण प्रमावी असा समरप्रसंग 'त्याची कुचंबणा' व 'आनीतेचें दिव्य' या दोनच कथांत साधला आहे. या दोन्ही कथांची मांडणी त्यामुळे आकर्षक झाली आहे. 'विटाळलेली देवता' यामध्ये लीलेच्या पत्रांतून ती स्वतःच सर्व हकीगत सांगत असल्यानें त्या निवेदनपद्धतींत साधेपणा व जिव्हाळा निर्माण झाला आहे. 'प्रेमवीराची शिकार' हा अेक विनोदी कथेचा सुन्दर नमुना म्हणून दाखवितां येअील. विशेषतः शेवटीं दिलेली विस्मयजनक 'कलाटणी' कलापूर्ण वाटते. प्रभाकराचें स्वभावचित्रहि लेखकानें मोठें गंमतीचें रेखाटलें आहे.

'मीच तिला मारलं' ही अत्यंत करुणरसपूर्ण अशी कथा आहे. जयवंत व माधुरी यांच्या विलक्षण कोंडमाऱ्याचें लेखकानें काढलेलें चित्र अतिशय हृदयस्पर्शी झालें आहे. 'बळी' या लघुकथेंतील पाल्हाळ जर वजा केला तर तीमधील मध्यवर्ती कल्पना व लतिकेच्या पतीचें चित्र हीं करुणाजनक आहेत.

प्रा. सरदेसाअी यांची भाषाशैली सहजरम्य आहे, वर्णनशैली सुन्दर आहे व गोमान्तकीय वातावरण निर्माण करण्याचें त्यांचें कौशल्य प्रशंसनीय आहे. पण स्त्री-पुरुषांच्या जीवनांतील मोहाचे प्रसंगच त्यांच्या लघुकथांतून सारखे सारखे येत गेल्यानें त्यांच्या लघुकथांतून सारखेपणा वाटूं लागला आहे. मानवी जीवनांत मोहाचे किंवा अधःपाताचे प्रसंग नसतात असें नाहीं पण त्याबरोबर

अुदात्त व ध्येयवादी जीवहि आपल्या सभोवताली असू शकतात. अशा ध्येयवादी जीवांच्या जीवनाचें, त्यांच्या आशा-आकांक्षांचें व त्यांच्या मानसिक तळमळीचें वर्णन त्यांनी जर केलें तर त्यांच्या लेखणीला अधिक अुजाळा चढेल यांत शंका नाही.

'तोंडचा घास' हा शान्तिलाल भंडारींचा पहिला कथासंग्रह. वाङ्मय हें केवळ करमणुकीचें साधन नाही, तें बहुजनसमाजाकरिता आहे व कलाविलासाबरोबर शिकवण देणाऱ्या गोष्टींचीहि भर मराठी वाङ्मयांत पडावी अशी त्यांची भूक आहे. आपल्या अेकंदर कथासंग्रहांतून दलितवर्गाचें चित्र रेखाटण्याचा त्यांनी प्रयत्न केला आहे. 'तोंडचा घास', 'रेडक्रॉस', 'मुकेला कोंडा', 'मेनकेचा नाच', 'कारभाऱ्याची कारभारीण' या लघुकथांतून त्यांनी शेतकरीवर्गाचें युद्धकालीन जीवन व त्यांच्यापुढे या काळांत पडलेले प्रश्न चित्रित करण्याचा प्रयत्न केला आहे. या कथांतून दलितवर्गाचे प्रश्न त्यांनी यथार्थतेने मांडले असतील, पण तें करतांना लघुकथेच्या कलेकडे त्यांनी लक्ष पुरविलें नाही असें नाअिलाजाने म्हणावें लागतें. जें कांही लघुकथेच्या द्वारें लोकांना शिकवावयाचें असेल तें शिकविण्यासाठी वाचकांच्या मनावर तें पक्कें ठसवावें लागतें, व तें वाचकांच्या मनावर पक्कें बिंबण्यास त्या लघुकथेने वाचकाच्या मनाची विलक्षण पकड घ्यावी लागते. प्रभावी समरप्रसंग, यशस्वी स्वभावदर्शन व योग्य वातावरण यांची आवश्यकता लघुकथेंत यासाठीच लागते. या कथासंग्रहांतील अेकहि गोष्ट या निकषाला अुतरत नाही. 'तोंडचा घास'मधील भिवाचें व 'मुकेला कोंडा'मधील जानकीचें, हीं दोन चित्रें मात्र थोडीफार परिणामकारक झालीं आहेत. 'नाट्यसंमेलनाचे अध्यक्ष' व 'आमच्या बापाचं काय जातंय?' या दोन्ही 'सर्व पात्रें काल्पनिक' या नांवाखाली लिहिलेल्या अुपहासकथा आहेत. त्यांतील नांवें सूचक असल्याने असे व्यक्तिगत हल्ले त्यांच्या मुकेला कसे रुचले हें अेक कोडेंच आहे.

'विद्युत्‌रेखा' ह्या सौ. मालतीबाअी दांडेकर यांच्या पुस्तकाचें स्वरूप अगदी निराळें आहे. आपल्या सभोवतालच्या स्त्रीजगतांतून त्यांनी या पुस्तकांत जवळ जवळ पंचवीस 'अविस्मरणीय' स्त्रियांच्या व्यक्तिच्छटा रंगवलेल्या आहेत. आतापर्यंत अशीं व्यक्तिचित्रें रंगविण्याचे यशस्वी प्रयत्न श्री. गोपीनाथ तळवळकर यांनी 'गृहरत्नें' या पुस्तकांत व श्री. प्र. श्री. कोल्हटकर यांनी 'ऋणानुबंधी' या पुस्तकांत केले आहेत. या पुस्तकाने अशा वाङ्मयप्रकारांत अेक प्रकारची अमोल भर घातली आहे असें म्हटलें तर अतिशयोक्ति होणार नाही. सौ. मालतीबाअींची भाषा प्रसादपूर्ण आहे व तिला अेक प्रकारची मोहक मुरड आहे. त्यामुळे या पुस्तकांतील व्यक्तिचित्रें अतिशय रम्य वठलीं आहेत. प्रत्येक व्यक्तीचें वर्णन करतांना त्या तें अितक्या समर्पक व मार्मिक शब्दांत करतात कीं त्या व्यक्तीचें चित्रच डोळ्यां-समोर अुभें राहावें. बाह्यस्वरूपाबरोबर त्या व्यक्तीच्या स्वभावांतील खाचाखोचाहि लेखिकेने मोठ्या मार्मिकतेने वर्णन केल्या आहेत. त्यामुळे 'विद्युत्'पासून 'रेखे'पर्यंत प्रत्येक स्त्री निराळी वाटतेच, अितकेंच नव्हे तर लेखिकेप्रमाणे त्याहि व्यक्ति आपल्याहि परिचितांपैकीच आहेत असा आपणाला भास होअूं लागतो. त्यांनी अर्थात् केवळ सद्‌गुणी स्त्रियांचींच व्यक्तिचित्रें त्यांत आणलीं आहेत असें नाही. सर्व प्रकारच्या व सर्व स्वभावाच्या स्त्रियांचें हें अेक संमेलनच आहे. आणि लेखिकेच्या व्यक्ति-मत्त्वाने रंगल्याने तें विशेष आकर्षक वाटतें. त्यामुळे व्यक्तिचित्रांच्या दालनांत हें पुस्तक म्हणजे अमोल अशी भरच असें म्हणण्यास कांहीच हरकत वाटत नाही.

म. ना. अदवंत

## नाटकें:—

(१) अर्थाचा अनर्थ:— ले० मा. कृ. शिंदे; प्रका० कृष्णाबाई वागळे, नवभारत प्रकाशन-संस्था, १४ बी, खोताची वाडी, मुंबअी नं. ४; मूल्य आठ आणे.

(२) आजोबांच्या मुली:— ले० माधव मनोहर; प्रका० नवभारत प्रकाशन संस्था, मुंबअी नं. ४; मूल्य रु. पांच आणे.

(३) आई— ले० माधव मनोहर; प्रका० पद्म प्रकाशन, मुंबअी; मूल्य बारा आणे.

(४) जन्माचे सोबती— ले० व्यंकटेश वकील; प्रका० वा. वि. भट, मीमरान वाडी, मुंबअी नं. २; मूल्य रु. १॥.

(५) गृहदाह— ले० गो. के. भट; प्रका० रामकृष्ण प्रकाशन मंडळ, मुंबअी नं. ४; मूल्य रु. १।.

(६) सिंगापुरांतून— ले० मा. वि. वरेरकर; प्रका० भारतीय लोकनाट्यसंस्था, १९० ब, खेतवाडी, मुंबअी नं. ४; मूल्य रु. १.

'अर्थाचा अनर्थ' आणि 'आजोबांच्या मुली' हीं दोन्ही विनोदी अेकांकी प्रहसनें 'दि डियर डिपार्टेड्' या अिंग्रजी अेकांकी नाटकांतील कल्पनेवर आधारलेलीं आहेत. असल्या प्रहसनांचें यश मुख्यतः त्यांतील संवादांवरच अवलंबून असतें. या दृष्टीने पाहतां श्रीयुत माधव मनोहर यांनी चांगली कामगिरी केली आहे. त्यांचे संवाद अत्यंत आकर्षक झाले असून पात्रांच्या वैशिष्ट्यानुसार भाषेच्या लकबी वापरण्यांत त्यांनी दाखविलेलें कौशल्य वरच्या दर्जाचें आहे. घरगुती बोलण्यांत नेहमी येणारे शुद्ध मराठी वाक्प्रचार योग्य रीतीनें वापरल्यामुळे हें रूपान्तर असावें अशा चुकून देखील संशय येत नाही. अुत्कृष्ट रूपान्तराचीं सारीं वैशिष्ट्यें श्री. माधव मनोहर यांनी आत्मसात् केलीं आहेत याला 'आजोबांच्या मुली' साक्ष आहेत. श्री. शिंदे यांच्या रूपान्तरांत माधव मनोहरांच्या भाषेतील खुसखुशीतपणा किंवा चटकदारपणा नाही. वाक्प्रचाराच्या आकर्षक लकबी जशा 'आजोबांच्या मुली'मध्ये अितस्ततः विखुरलेल्या दिसतात तशा 'अर्थाच्या अनर्था'त दिसून येत नाहीत. या दोन रूपान्तरांमध्ये वाचन व प्रयोग या दोन्ही दृष्टींनी 'आजोबांच्या मुली' निःसंशय अधिक परिणामकारक झाल्या पाहिजेत.

संवाद आकर्षक करण्याचें आणि घरगुती वळणाचे वाक्प्रचार परिणामकारक रीतीने वापरण्याचें कौशल्य ज्याप्रमाणे श्री. माधव मनोहर यांनी 'आजोबांच्या मुली'मध्ये दाखविलें आहे त्याप्रमाणे अमानुष संहाराला कारण होणाऱ्या व हजारों घरादारांची अक्षरशः राखरांगोळी करणाऱ्या आधुनिक युद्धाचें वैयर्थ्य पटविणाऱ्या कॅरेल् कॅपेक्च्या 'मदर' या नाटकाच्या अनुवादांत त्यांनी गंभीर विषयाला अत्यंत योग्य अशी भारदस्त आणि प्रौढ भाषा वापरण्याचें फार मोठें कौशल्य दाखविलें आहे. मुळांतच हें नाटक अगदी जीव दडपून टाकणारें आहे. युद्धाचा क्रूरपणा, निष्पाप जीवांचा घात, राष्ट्राला आपल्या कर्तबगारीने यशाच्या शिखरावर नेअून सोडण्याचें सामर्थ्य ज्यांच्यामध्ये आहे अशा प्रतिभावान् कर्त्यांची, संशोधकांची, कलावन्तांची अकालीं होणारी दारुण हत्या यांविषअी विचार करणाऱ्या सहृदय मानवाच्या मनाची विलक्षण तडफड त्या नाटकांत व्यक्त झाली आहे. आपलीं सारीं मुलें आपल्याला सोडून युद्धाच्या वणव्यांत होरपळण्यासाठी घरदार सोडावयास तयार होण्याअितपत निर्दय होअूं शकतात हें दिसल्यामुळे अपत्यप्रेमाने ओथंबलेल्या अेका वृद्ध मातेच्या मनाची झालेली कालवाकालव त्यांत स्पष्ट झालेली आहे. अशा या नाटकाच्या अनुवाद करीत असतां अनुवादकावर जी मोठी जबाबदारी पडते ती श्री. माधव मनोहर यांनी योग्य रीतीने पार पाडली आहे. विषयाच्या गांभीर्याला अुचित अशी भाषा परिणामकारक रीतीने वापरण्याचें त्यांचें कौशल्य या अनुवादांत स्पष्ट झालें आहे. अिंग्रजी वळणाच्या रचना, अिंग्रजी वळणाचे वाक्प्रचार अित्यादि गोष्टींमुळे अनेक अनुवादांमध्ये जें वैगुण्य राहून जातें तें या अनुवादांत आढळणार नाही.

चांगल्या अनुवादाच्या सर्व कसोट्या या अनुवादाला लावूनहि तो पुष्कळ वरच्या दर्जाच्या अुतरला आहे असें म्हणावयास कांहीच हरकत नाही. अनुवादाचें तंत्र माधव मनोहरांनी यथायोग्य रीतीने पाळलें आहे. मुळांतील कल्पना विकृत न करितां, मूळ लेखकाला जें म्हणावयाचें नव्हतें तें त्याच्या माथीं मारण्याचा अुपद्व्याप न करितां अनुवाद चांगला करतां येणें शक्य आहे हें या अनुवादावरून स्पष्ट झालें आहे. चांगला अनुवाद ही मुळीच सोपी गोष्ट नाही. अनुवादाची भाषा आक-

र्पक करण्याची व आपली स्वतःचीच भाषा आपण वाचीत आहों, परकीय भाषा वाचीत नाही, अशी वाचकाची खात्री पटविण्याची फार मोठी कामगिरी अनुवादकावर पडत असते. हें श्री. माधव मनोहर यांनी चांगलें साधलें आहे.

अनुवादांत अुत्पन्न होणाऱ्या आणखी अेका अडचणीविषयी लिहिणें भाग आहे. मूळ नाटकांत दाखविलेलें प्रत्यक्ष युद्धाचें वातावरण व घटना युरपमधील राष्ट्रांना चांगल्याच परिचित आहेत. मूळ नाटकांत ज्या घटना अगदी वास्तविक वाटतात त्या अनुवादांत देखील तितक्याच वास्तविक केव्हा वाटतील ? मूळ नाटकांतील परिस्थिति आणि अनुवादामधील देशाची परिस्थिति बरीचशी समान असेल तेव्हा. पण ज्या युद्धविषयक प्रत्यक्ष घटनांवर मूळ नाटक आधारलेलें आहे त्या घटना आपल्या या देशांत अजून तरी पूर्ण अपरिचित आहेत. आणि यामुळे मूळ नाटकांतील 'मदर' जें बोलूं शकेल तें आपल्या सध्याच्या समाजांतील म्हातारी आआी बोलूं शकणार नाही; ती जर युद्धासंबंधी माहीतगारपणें बोलूं लागली तर तें चमत्कारिक वाटेल. मूळ मानवी भावना सर्वत्र सारख्या असल्या तरी परिस्थिति भिन्न असल्यामुळे तपशिलांत फरक पडलाच पाहिजे. म्हणून आआी, बाबा, दादा, भय्या, आजोबा अित्यादि पूर्ण देशी व्यक्ति युद्धाच्या घटना अगदी डोळ्यांसमोर घडत असल्याप्रमाणे जिव्हाळ्याने बोलतात हें कितीहि प्रयत्न केला तरी स्वाभाविक वाटत नाही. मूळ परिस्थितींत तीं तीं पात्रें तसें बोललीं तर त्यांत अस्वाभाविक असें कांहीच नाही; पण त्या पात्रांना देशी पेहराव चढवला की त्यांचें बोलणें चमत्कारिक वाटूं लागतें. कॅपेकची 'मदर' जाअून तिच्या ठिकाणीं महाराष्ट्रीय समाजांतील अेखादी आआी आली की लगेच मुळांतील अत्यंत स्वाभाविक वाटणारे युद्धविषयक अुल्लेख अनुवादांत अस्वाभाविक वाटूं लागतात. पेहराव बदलल्यामुळे हें झालें. तेव्हा अेक तर मूळ पात्रांचा पेहराव मुळीच न बदलतां तींच नांवें कायम ठेवून मूळ लेखकाला अन्याय न करितां पण भाषेंतील आकर्षकपणा कायम ठेवून सरळ भाषान्तर करणें हा अेक मार्ग किंवा मुळांतील मध्यवर्ती कल्पना तेवढी घेअून त्या कल्पनेचा पसारा आपल्या परिस्थितींत योग्य दिसेल अशा रीतीने करणें हा दुसरा मार्ग. परिस्थिति अगदी भिन्न असली व मुळांतील कल्पना आपल्या परिस्थितींत व आपल्या पेहेरावाला अनुरूप दिसण्यासारख्या नसल्या तर मूळ नांवें व व्यक्ति कायम ठेवूनच भाषान्तर करावें. देशी पेहेराव पात्रांना घातल्यामुळे हें नाटक आपल्या स्टेजवर येअूं शकेल; पण आपल्या ओळखीचीं महाराष्ट्रीय माणसें आपल्याला अगदी अपरिचित असे स्वित्झरलंडमधील विचार बोलतांना दिसलीं म्हणजे तें चमत्कारिक वाटतें. आपल्या भूमीवर प्रत्यक्ष युद्धघटना होअूं लागल्या तरच तें अस्वाभाविक वाटणार नाही; पण जोपर्यंत आपणांकडे युद्ध ही अेक रम्य कथा आहे तोपर्यंत असा प्रयोग चमत्कारिक वाटणारच. पृष्ठ ३८ वर बाळ म्हणतो, "कुठचं तरी फॉरेन स्टेशन होतं...स्वीडन वगैरे तिकडचं कुठलं तरी असावं. तें अैकून मला बर्फानं झाकलेल्या शुभ्र पर्वताची आठवण झाली". स्वित्झरलंडमधील मुलाच्या तोंडीं हें शोभेल, महाराष्ट्रांतील बाळच्या तोंडीं मात्र तें हास्यास्पद दिसतें. तसेंच पृष्ठ ९ वर राजा म्हणतो, "लाल प्यादीं हल्ला करताहेत आणि हिरवीं प्यादीं मागे हटताहेत" अित्यादि अुद्गारांतील 'लाल प्यादीं' या शब्दांत ध्वनित असलेली रशियन लाल सैनिकांची कल्पना महाराष्ट्रीय माणसाला अपरिचित असल्यामुळे हा अुल्लेख फार चमत्कारिक वाटतो. अशीं अनेक अुदाहरणें देतां येतील. हा अस्वाभाविकपणा घालविण्याचा अेकच मार्ग म्हणजे मूळ पात्रांचा पेहराव न बदलतां अनुवाद करणें.

'जन्माचे सोबती' आणि 'गृहदाह' नाटकांमध्ये आधुनिक जगांतील बदलत्या सामाजिक परिस्थितीमुळे अुत्पन्न होणारे प्रश्न विचारासाठी घेतलेले आहेत. 'जन्माचे सोबती' या नाटकांत स्त्री-पुरुषांचा विवाहबाह्य संबंध चर्चेसाठी घेतला आहे. गेल्या कांही वर्षांत निर्माण झालेल्या मराठी ललितवाङ्मयाकडे पाहिलें तर पत्नी जिवंत असतां पतीने दुसऱ्या अेखाद्या स्त्रीशीं प्रेमाचे संबंध ठेवणें याच अेका विषयाची मनसोक्त चर्चा आढळते. जणू जगांत सामाजिक महत्त्वाचा असा हा अेकच विषय आहे. त्याच विषयावर हें नाटक लिहिलें आहे. अलीकडील बदललेल्या आणि रोज जास्तच

बदलत असलेल्या सामाजिक परिस्थितीमुळे कांही नवीन प्रश्न अुत्पन्न होणें अपरिहार्य आहे. स्त्रीशिक्षण झपाट्याने फैलावल्यामुळे आणि स्त्रीपुरुषांच्या सहवासाविषयींच्या पूर्वीच्या कल्पना नष्ट होअून त्या ठिकाणीं अनिर्बंध सहवासाची कल्पना आल्यामुळे विवाहित पुरुषाचा अेखाद्या अविवाहित स्त्रीबरोबर सहवास होणें अगदी शक्य आहे. अशा या सहवासामुळे जे नाजुक व महत्त्वाचे प्रश्न अुत्पन्न होणें अपरिहार्य आहे त्यांची चर्चा नुसती करीत बसण्याअैवजी अशा परिस्थितींतून मार्ग कोणता काढावा हें कोणीं सांगितलें तर बरें. पण 'प्रश्न अुपस्थित करण्याचें काम तेवढें आमचें, अुत्तरें देण्याची आम्हांला जरूर नाहीं' असा नवीन पद्धतीप्रमाणे अभिनिवेश बाळगून लेखक प्रश्नच तेवढे अुपस्थित करीत राहणार हें अवघड आहे. समाजाने वाटल्यास अुत्तरें शोधून काढावीं. विवाहबाह्य संबंधापासून अुत्पन्न होणाऱ्या गुंतागुंतीच्या प्रश्नांबाबत शॉने अशी तोड काढली आहे. ज्या ठिकाणीं स्वतःच्या पत्नीखेरीज अितर अेखाद्या अविवाहित स्त्रीशीं पुरुषाचा संबंध येतो व हा सहवास मर्यादेबाहेर वाढत जाण्याची भीति वाटूं लागते त्या ठिकाणीं त्या स्त्रीशीं जर विवाह करावयाचा नसेल किंवा विवाह करतां येणें जर शक्य नसेल तर पुरुषाने त्या स्त्रीचा सहवास तावडतोब बंद करावा आणि त्या अविवाहित स्त्रीनेहि समजूतदारपणें असेंच करावें. शॉने ही जी समजूतदारपणाची तोड काढली आहे ती विकारवश स्त्रीपुरुषांना भावनांच्या आवेगांत अुपयोगांत आणतां येणें बहुतांशीं अशक्य किंवा फारच कठीण असल्यामुळे पहिल्या संसाराचा बोजवारा अुडणें हेंच अशा विवाहबाह्य संबंधाचें पर्यवसान ठरतें. 'जन्माचे सोबती' या नाटकांत विवाहित पुरुषाचा अेका अविवाहित, तरुण आणि लाघवी स्त्रीशीं दाट सहवास घडतो व तीं दोघेंहि परस्परांविषयींच्या प्रेमाने ——किंवा मोहाने—तळमळूं लागतात असें दाखविलें आहे. पण पुढे पत्नीवरील प्रेम आणि अुन्मादक तारुण्याविषयी व सौंदर्याविषयी वाटणारी अनावर आसक्ति या दोन गोष्टींच्या कलहात मोहावर ध्येयाचा विजय होतो असें दाखविलें आहे. मोहावर ध्येयाचा विजय झाला हें दाखविण्यांत कांही चुकलें असें नाहीं; पण हा विजय अितका अचानक झालेला लेखकाने दाखविला आहे की तसा तो होअूं शकेल हें खरें वाटत नाही. स्वतःच्या पत्नीची कित्येक दिवस प्रतारणा करून चोरट्या प्रेमाचे खेळ खेळण्यांत दंग झालेला व पत्नी केव्हा मरेल व आपल्याला जिवाची सखी केव्हा भेटेल यासाठी तळमळणारा पुरुष अेकदम मोहाच्या गोष्टीचा त्याग करील व पत्नीकडे परत येअील असें वाटत नाही. व्यवहारांत असें अितकें सुलभपणें कधीच घडत नाहीं. फार मोठा आघात झाल्याशिवाय, पत्नीचा व स्वतःचा, किंवा पत्नीचा व दुसऱ्या स्त्रीचा मोठा झगडा झाल्याशिवाय पुरुष सहजासहजीं मोहाचा त्याग करीत नसतो हा जगाचा अनुभव आहे. या नाटकांतील पात्रें भारीच शहाणीं आणि समजुतदार आहेत. समजूतदारपणा केव्हाहि चांगला, पण तो अकारण अुत्पन्न होतां कामा नये. या नाटकांतील नायक अगदी झटपट आपली चूक अुमजतो, त्याला कांही कारण नसतां अचानक पश्चात्ताप होतो, लुब्ध झालेल्या तरुणीचा अेकदम त्याग करतो आणि नवरा-बायकोचें मीलन होतें; व गंमत अशी की त्या दोन स्त्रिया अत्यंत शान्त चित्ताने साधकबाधक चर्चा करीत बसतात.

नाटकांतील संवाद चांगले आहेत. पण शाम या अवघ्या नअू वर्षांच्या मुलाच्या तोंडीं प्रौढ माणसांच्याच तोंडीं शोभेल अशी भाषा अनेक ठिकाणीं घातली आहे अुदा० पृ. ६१ 'मग मोठ्या माणसांनी असं लक्ष घालण्याजोगं वागावं काय म्हणून?' असले कांही अपवाद सोडून दिले तर नाटकांतील संवाद स्टेजवर परिणामकारक होण्याअितके आकर्षक आहेत.

'गृहदाह' या नाटकांत आधुनिक सामाजिक परिस्थितींतून निर्माण होणारा आणखी अेक प्रश्न विचारासाठी घेतला आहे. बेताच्या महत्त्वाकांक्षा असलेला, मिळेल त्या पैशांत समाधान मानून राहणारा, शहरांतील चैनीच्या राहणीला न लालचावलेला, अुलट खेडेगावच्या शान्त वातावरणाला हपापलेला आणि स्वतःच्या सुशिक्षित पत्नीवर निःसीम प्रेम करणारा व सुशिक्षितपणामुळे तिच्या ठिकाणीं अुत्पन्न झालेल्या स्वतंत्र विचारांना दडपून न टाकण्याअितपत समजूतदार असलेला असा नायक आणि मूळच्या सालस परंतु घराबाहेरच्या जगांतील मोहांनी आकृष्ट होअून शेवटीं नवऱ्याच्या

अिच्छेविरुद्ध सिनेमांत शिरणारी नायिका असें हें द्वंद्व या नाटकांत आहे. नायिका शैला स्वतःस घराच्या चार भिंतींच्या आंत कोंडून घ्यावयास तयार नाही; तिला 'आत्मविकास' करावयाचा आहे, आपल्या या महत्त्वाकांक्षेच्या आड स्वतःचा पति येत आहे असें तिला वाटूं लागतें. 'आत्मविकास' करावयाचा म्हणजे काय करावयाचें? सिनेमांत जाअून स्वतःचें व्यक्तिमत्त्व प्रकट करावयाचें ही तिची आत्मविकासाची कल्पना आहे. अुलट तिच्या नवऱ्याला असें वाटतें की, संसारांत बाहेरचीं कामें पुरुषानें करावीं व स्त्रीनें घराचें नंदनवन करावें. पण यानें स्त्रीचें व्यक्तिमत्त्व नाहीसें होतें असें शैलाला वाटतें. तिच्या मतें संसाराची खरी जबाबदारी स्त्रीवरच पडते. ती घरांत अितकी गुरफटून गेलेली असते की अिकडे तिकडे करायला तिला कधी फुरसत मिळत नाही. पण सिनेमांत मात्र "वाटेल तेवढा पैसा मिळतो...कीर्ति मिळते...घराच्या व्यापांतून सुटतां येतें...अन् मुख्य म्हणजे आकांक्षेला अवसर मिळतो". (पृ. २५) तेव्हा आकांक्षांना अवसर मिळावा, व्यक्तिमत्त्व प्रकट व्हावें, कीर्ति मिळावी आणि पैसा मिळावा या अिच्छेने पत्नी सिनेमांत हट्टानें गेली तर घराचें घरपण नष्ट होअूं नये यासाठी तळमळणाऱ्या तिच्या पतीनें काय करावें? पत्नी सिनेमांत गेल्यावर तिच्या सर्व सुप्त आकांक्षा पूर्ण होतात; तिचें व्यक्तिमत्त्व प्रकट होतें (म्हणजे काय होतें कोणास ठाअूक!); पण अिकडे पतीचा घरात कोंडमारा होअूं लागतो, आपण आपल्या बायकोच्या पैशावर जगत आहोंत ही जाणीव मनाला छळूं लागते; पत्नीपुढे स्वतःस कोणीहि विचारीत नाही या कल्पनेनें पदोपदीं अपमान झाल्याप्रमाणें वाटतो; मग यांतून बाहेर कसें पडावयाचें? आपला नायक शेवटीं हताश होअून घर सोडून जातो. अिब्सेनची नोरा घर सोडून जाते, रांगणेकरांची भानुमती घर सोडून जाते, त्याप्रमाणेच सिनेमांत जाअून स्वतःचें व्यक्तिमत्त्व प्रकट करूं अिच्छिणाऱ्या पत्नीला सुधारण्याचा प्रयत्न अयशस्वी झाल्यामुळे आपला नायकहि बॅग हातांत घेअून घर सोडून जातो; व तो निघून गेल्यावर अेक क्षणभरच वाअीट वाटलें असा नायिकेला भास होतो व ती लगेच आत्मविकासाच्या, व्यक्तिमत्त्व प्रकट करण्याच्या कर्तव्याची जाणीव होअून स्वतःला सावरते व नित्याच्या व्यवसायाला लागते.

नाटकांत खरा प्रॉब्लेम कोणाचा आहे? घराच्या चार भिंतींत कोंडल्यामुळे चिडलेल्या व आत्मविकास करून घेअूं अिच्छिणाऱ्या नवसुशिक्षित स्त्रीचा? की आधुनिक समाजांतील अपरिहार्य अशा नवीन घटनांमुळे मनाचा प्रत्यहीं कोंडमारा होत असलेल्या पुरुषाचा? मला वाटतें, स्त्रीचे सारे प्रॉब्लेम्स् आता संपत आले आहेत. आता पुरुषांच्या प्रॉब्लेम्सना सुरवात झाली आहे. नव्यानेच, जेव्हा स्त्रियांच्या प्रश्नांना तोंड फुटलें तेव्हा पुरुषी अरेरावीला कंटाळून स्त्रिया घरांतून बाहेर पडूं लागल्या. त्याचप्रमाणे सिनेमांत किंवा तत्सम व्यवसायांत विवाहित स्त्रिया जाअूं लागल्यामुळे पुरुषांचा कोंडमारा होणें शक्य आहे व यांतून बाहेर पडण्याची वाट न सांपडल्यामुळे कंटाळून आतां पुरुष घराबाहेर पडणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत. तेव्हा हा स्त्रीचा प्रॉब्लेम् नसून आधुनिक जगांतील पुरुषाचा प्रॉब्लेम् आहे. स्त्री सिनेमांत अफाट पैसा मिळवूं लागली की तिच्यावर अरेरावी गाजवतां येत नाही व तिचा 'आत्मविकास', 'व्यक्तिमत्त्वाचें प्रकटीकरण' अित्यादि आधुनिक तंत्रें त्याला मानवत नाहीत. अशा स्थितींत त्याने काय करावें?

नाटक चांगलें लिहिलें आहे. संवाद व घटना अुत्कृष्ट आहेत. स्टेजवर रंगण्याच्या दृष्टीने आवश्यक असलेले गुण भरपूर आहेत.

**'सिंगापुरांतून'** हें श्री. वरेरकरांचें प्रचारात्मक नाटक आहे. ब्रह्मदेश जपान्यांनी जिंकल्यानंतर रंगूनहून पळून सिंगापूरला गेलेल्या अेका हिंदी देशभक्ताचें चित्र रेखाटून त्याच्याकरवीं जपानी लोक आणि त्यांची राजनैतिक कारस्थानें यांविषयीं वाचकांच्या मनांत तिरस्कार अुत्पन्न करण्याचा नाटककारांनी प्रयत्न केला आहे. फॅसिस्टांच्या जुलमी अमलाविषयीं तिरस्कार अुत्पन्न करण्याचें काम अेखाद्यानें केलें तर त्यांत कांहींच बिघडलें नाही. पण श्री. वरेरकरांनी केलेला प्रचार मात्र वर्तमानपत्रांत नेहमी दिसणाऱ्या 'स्वातंत्र्यासाठी लढा' असा मथळा असलेल्या जाहिरातींच्याच सदरांत

पडण्याजोगा आहे असें मोठ्या खेदाने म्हणावेंसें वाटतें. त्या जाहिरातींतील 'शूर मराठ्यांनो, अुठा! तुमच्यामध्ये पुन्हा शिवाजी निर्माण होअूं द्या' अित्यादि 'कवित' वाचून ज्याप्रमाणे थोडा वेळ करमणूक होते त्याचप्रमाणे हेंहि नाटक वाचून होते. साम्राज्यमदाने धुंद झालेल्या जुलमी नाझींविषयी व जपानी फॅसिस्टांविषयी वाचकांच्या मनांत तिरस्कार अुत्पन्न व्हावा हा लेखकाचा अुद्देश जसा सफळ व्हावयास पाहिजे तसा झाला नाही, याचें कारण पाशवी शक्तीविषयीचा आत्यंतिक तिरस्कार येवढी अेकच कल्पना लेखकाच्याहि मनांत नाही. पाशवी सामर्थ्याचे दुष्परिणाम काय होअूं शकतात हें प्रचार न करितांहि दाखवितां येणें कांही अशक्य नाही. अुदात्त गोष्टीसाठी प्रचार केलेलाहि चालेल; पण त्या प्रचारांत आपल्याला सोयिस्कर असलेल्या गोष्टीच तेवढ्या नेमक्या अुचलून बाकीच्या स्पष्ट दिसणाऱ्या अनेक गोष्टींकडे लेखकाने बळेंच दुर्लक्ष केलें आहे असें दिसून आलें तर लेखकाच्या हेतूविषयीच शंका निर्माण होणें स्वाभाविक आहे. प्रस्तुत नाटकांत नेमकें हेंच झालें आहे. आणि आपल्या हेतूंविषयी अशी शंका वाचकांच्या मनांत अुत्पन्न होण्याचा संभव दिसल्यामुळेच प्रस्तावनेंत नाटककारांनी आपल्यावरील जबाबदारी झटकून टाकण्याचा प्रयत्न केला आहे. पण 'सर्वस्वी प्रचारात्मक' असलेल्या नाटकाच्या लेखकावर पात्रांच्या तोंडीं घातलेल्या भाषेची कांहीच जबाबदारी नसते असें कोणीं कितीहि ओरडून सांगितलें तरी तें खरें मानण्याचें कारण नाही. प्रचारात्मक लेखनांत लेखकाला कोणत्या तरी गोष्टीचा निश्चित प्रचार करावयाचा असतो. या प्रचारासाठी तो कांही योग्य व्यक्ति निवडीत असतो. अर्थात् अभिप्रेत असलेला प्रचार जिच्यायोगें होअील अशीच भाषा लेखकाला वापरावी लागते. अलिप्तपणा— मॅथ्यू आर्नोल्ड ज्याला aloof detachment म्हणतो— हा गुण अितर वाङ्मयप्रकारांत शक्य असला आणि स्पृहणीयहि असला तरी प्रचारात्मक वाङ्मयाशीं या गुणाचा कांहीच संबंध नसतो हें विसरतां यावयाचें नाही. मग "पात्राच्या मनोरचनेच्या अनुरोधाने लेखक जे विचार मांडतो ते त्या विशिष्ट पात्राचे असतात—लेखकाचे नसतात" असा निर्वाळा देण्याची लेखकावर पाळी कां यावी? स्वतःचें नाटक 'सर्वस्वी प्रचारात्मक' म्हणावयाचें आणि 'पात्रांच्या तोंडच्या भाषेशीं माझा कांहीच संबंध नाही' असेंहि म्हणावयाचें हें चमत्कारिक वाटतें. साऱ्याच पात्रांचे विचार लेखकाचे नसतात हें सांगण्याची जरुरी नाही; पण ज्या तत्त्वाचा अथवा मताचा निश्चित प्रचार करावयाचा असें लेखकाने ठरविलेलें असतें त्या प्रचारासाठी निवडलेल्या पात्रांचे विचार जर लेखकाचे नसले तर लेखक कशाचा प्रचार करणार? तो लेखकाने केलेला प्रचार नव्हे—अनेक मतें असलेल्या लोकांचा तो अकारण झालेला असंबद्ध वादविवाद होय! प्रचारवादी लेखकाने असा विश्वामित्री थाट आणणें योग्य नव्हे.

श्री. वरेरकरांना कोणत्या गोष्टीचा प्रचार करावयाचा आहे? फॅसिस्टांविरुद्ध जनमत कलुषित व्हावें याच गोष्टीचा ना? यासाठी शांताराम ही प्रमुख व्यक्ति त्यांनी निवडली आहे. त्याच्या राष्ट्रप्रेमाबद्दल आणि जपान्यांविषयींच्या तिरस्काराच्या खरेपणाबद्दल शंका घेण्याचें आपल्याला कांही कारण नाही. पण नुसतें राष्ट्रप्रेम प्रकट करून आणि जपान्यांविषयी तिरस्कार दाखवून हे गृहस्थ थांबत नाहीत; अिंग्रजांच्या ताब्यांतील हिंदुस्थान आणि जपान्यांच्या ताब्यांतील ब्रह्मदेश यांची तुलना करून हिंदुस्थान हा फार सुखी असें दाखविण्याचा त्यांचा आटोकाट प्रयत्न चाललेला आहे. उदा० 'असल्या स्वातंत्र्यापेक्षा ती आमची हिंदी गुलामगिरी पत्करली' (पृ. १६); जपानी लोक हिंदुस्थानला स्वातंत्र्य देण्यासाठीच हिंदुस्थानच्या हद्दींत शिरत आहेत ही गोष्ट जितकी खोटी तितकीच जपान्यांशीं हिंदी लोक लढत आहेत ते भारताच्या स्वातंत्र्यासाठी हीहि गोष्ट खोटी. 'स्वातंत्र्यासाठी लढा' असा आदेश भारताच्या स्वातंत्र्याच्या प्रेमाने दिला गेला आहे असें मानणारा मानव भारीच प्रेमळ असला पाहिजे. पण आपल्या शांतारामाच्या आणि त्याच्या मित्राच्या लक्षात ही गोष्ट कधीहि येणें शक्य नाही. शांतारामच्या तोंडचे कांही उद्गार विशेष चिंत्य आहेत— "ही कसली संघटना? फितुरी आहे ही. अन् तो अेक माथेफिरू मिळालाय त्यांना पुढारी म्हणून" (पृ. २९); "धेड्याघरच्या सुरीनं मायभूमीचे बंद तोडतां येत नाहीत हें कधी कळणार या नेत्याला?" (पृ. ३३); "आंधळे

आहेत हे सारे—वारे आहेत! मतत्या माणसांच्या नादीं लागले आहेत, तो हिंदी आहे म्हणून" (पृ.४३): अेकंदर नाटक वाचून झाल्यावर वरेरकरांना अभिप्रेत असलेला परिणाम वाचकाच्या मनावर होअील की नाही याची जबर शंका वाटते. यांत प्रामाणिक प्रचारहि नाही आणि कलाहि नाही. प्रचार प्रामाणिक आणि कलात्मक असला म्हणजे त्याविषयी नाकें मुरडण्याची पाळी वाचकांवर येत नाही. 'पात्रांचे विचार माझे नव्हत' असें म्हणून वरेरकरांनीच आपला प्रचार अुसना आहे हें आडून सांगितलें आहे. तेव्हा प्रामाणिकपणा नसल्यामुळे नक्की कशाचें प्रतिपादन करावयाचें तेंच त्यांचें ठरलें नाही आणि प्रतिपादनाची निश्चिति नसल्यामुळे तें परिणामकारक झालें नाही; आणि यामुळे नाटकांत कलेचा माग फारच थोडा दिसला तर त्यांत कांही नवल नाही. "Effectiveness of assertiou is the Alpha and Omega of style" हे शॉचे उद्गार अगदी सार्थ आहेत!

रा. शं. वाळिंबे

## कादंबरीः —

(१) झुंज— ले० ना. के. महाजन; प्रका० महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबअी नं. ४; मूल्य रु. ६.

(२) मधली भिंत— ले० ज. ग. शिंके; प्रका० गोमंत प्रकाशन, मडगांव; मूल्य रु. १॥.

(३) शिकार— ले० व प्रका० आनंदीबाअी जयवंत, दिलखुश बंगला, शिवाजी रोड, बडोदें; मूल्य रु. १२ आणे.

**झुंज** : आअी, बाप आणि मुलगा यांच्यांतील मतभेदामुळे कौटुंबिक जीवनांत अुत्पन्न झालेली झुंज या कादंबरींत लेखनपद्धतीच्या विशिष्ट कौशल्याने आकर्षकपणें रंगविली आहे. राधाबाअींचा लहानपणीं शेखरशीं परिचय झाला. त्या परिचयांत मातृभूमीची सेवा करण्याचे विचार अत्यंत अुत्कटपणें त्यांच्या मनांत येत. परंतु स्वतःच्या जीवनांत मातृभूमीची सेवा करण्याची त्यांची अिच्छा पूर्ण होत नाही हें कळल्यावर त्यांच्या मुलाच्या ठिकाणीं, रवीच्या ठिकाणीं, त्या अुत्कट अिच्छेचें बीजारोपण झालें. परंतु पति– रवीचे वडील यशवंतराव– वृत्तीनेहि सरकारी नोकर असल्याने त्यांनी आपल्या पत्नीशीं तीव्र झगडा सुरू केला. आपल्या मुलाला तिची फूस आहे असें कळल्यावर ते मुलाचाहि तिरस्कार करूं लागले. पतीकडून होणाऱ्या अवहेलनेंत राधाबाअींना विलक्षण यातना होअूं लागल्या. त्यांतच त्यांचा अंत झाला. रवीने वडिलांपासून आअीचें रक्षण करण्यासांठी वडिलांशीं अुघड अुघड विरोध केला. रवीचा अेका क्रांतिकारक संघटनेशीं संबंध आहे अशा पुराव्यावरून त्यांनी अकांडतांडव केलें. पत्नीची निर्भत्सना केली. तिचा शेवटीं अंत झाला. मरण्यापूर्वी रवि आपली अुत्कट-अिच्छा पूर्ण करीत असल्याचा त्यांना आनंद झाला. परंतु मरतांना त्यांनी रवीकडून वचन घेतलें की, वडिलांशीं झगडणार नाही आणि राजकारणांत पडणार नाही! रवीने वडिलांपासून दूर राहण्यासाठी गृहत्याग केला! त्यापूर्वी क्रांतिवादी प्रकाशशीं त्याचा दृढ संबंध आला होता. दोघांनी देशजागृतीच्या कार्यांच्या कांही योजना ठरविल्या होत्या. परंतु आअीला दिलेल्या वचनासांठी त्याला त्या पूर्वीच्या वातावरणापासून दूर व्हावें लागलें. पत्नीच्या मृत्यूनंतर आणि मुलाने गृहत्याग केल्यावर आपण आपल्या मताच्या आग्रहासाठी क्रूरपणाने वागल्याबद्दल पित्याला पश्चात्ताप झाला. परंतु रवीने त्यांना क्षमा केली नाही व तो घरीं परत आला नाही. अशा रीतीने या झुंजीमध्ये तिघांच्या तीन वाटा झाल्या! परंतु कादंबरींत आणखी अेक झुंज दाखविली आहे. प्रकाश व रवि यांच्याबरोबरच हंसा व शोभा या दोन तरुणी आहेत. रवीचें शोभावर प्रेम होतें. परंतु शोभावर अेका प्रवासांत डायर नांवाच्या सोजिराने बलात्कार केल्यामुळे ती रवीला आपल्या कलंकित देहाशीं विवाहसंबंध जोडूं देत नाही. हंसाकडे ती त्याचें मन वळवते. पण हंसाबद्दल त्याला प्रेयसीसारखें आकर्षण वाटत नाही. शेवटीं शोभेचें वरील कारण कळल्यावर रवि तिचा तिरस्कार न करतां तिचा स्वीकार करतो! असा या दुसऱ्या तेढीचा शेवट होतो! हीहि

अेक झुंज ! अशा प्रसंगांनी गुंफलेल्या कथानकांत प्रसंगाला थोडी सुरुवात करून ठेवून तो मध्येच सोडून अेकदम पुढचा प्रसंग आणि पुढील प्रसंगाच्या ओघांत मागील प्रसंगांत अस्फुट राहिलेला भाग सांगणें अशी 'रहस्य' पद्धति लेखकाने स्वीकारली आहे. परंतु कांही ठिकाणीं तें 'रहस्य' फारच दुबळें असल्याने अुत्सुकता वाढविण्याचा प्रयत्न फसला आहे. त्याच युक्तीचा वारंवार अुपयोग केल्याने कांही ठिकाणीं स्वारस्य गेलें आहे. यशवंतराव, राधाबाअी व रवि यांच्यांतील झुंज जितकी स्वाभाविक व परिणामकारक झाली आहे तितकी रवि, शोभा व हंसा यांच्यांतील झाली नाही. गृहत्याग केल्यावर रवि नेमका शोभेच्या हातीं लागून तिच्या घरीं मुक्काम ठोकतो. आअीला दिलेल्या वचनासाठीं तो हळहळतो. परंतु त्या प्रतिज्ञेपायीं त्याने अेकदम घरजांवयासारखें जगूं लागावें हें विचित्र वाटतें. शोभेने रवीला होकार न देण्याचें कारण— डायर प्रकरण— सांगण्याचें क्षुगाच लांबणीवर टाकलें आहे ! तोपर्यंत तिच्याशीं अुत्कट सहवासाचे अनेक प्रसंग तन्मयतेने अनुभवल्यावर शोभेची प्राप्ति निश्चित झाल्यावर मग माझें प्रेम शरीरावर नाही, शरीर कलंकित झालें म्हणून काय झालें, अित्यादि त्याच्या सात्त्विक प्रेमाच्या भाषा आणि ध्येयवाद निव्वळ ढोंग वाटतें. हंसाबद्दल कांही आकर्षण वाटूं नये ही मनोवृत्ति कळण्यासाठी स्त्रीच्या मनोवृत्तीचें पुष्कळच विवेचन करणें आवश्यक होतें. कथानकांत हिंसा अहिंसा विषय आणतांना जवाहरलालना कां आणलें आहे, त्याचा कथानकास कसा अुपयोग होतो किंवा तें कसें आवश्यक आहे कोणास ठाअुक ?

कथानकासाठी फार पसारा जमविल्यामुळे असे दोष अुत्पन्न झाले आहेत. प्रकाशचें जीवन अेखाद्या महान् क्रांतिकारकासारखें असावें असा जो आरंभीं अंदाज होतो, तो सपशेल फसतो. शोभेकडून 'डायर' हें नांव कळल्यावर रवीने त्या डायरला अेका चित्रपटगृहांत हेरून ठार करणें हा प्रसंग फारच ओढूनताणून आणून कादंबरीचा शेवट झाला आहे !

लेखनपद्धतीच्या दृष्टीने मनःस्थिति व निसर्ग यांचें संवादित्व कथानकांत फार परिणामकारक झालें आहे. सूचकतेने अुत्सुकता वाढविण्याचा मार्गहि बराच यशस्वी झाला आहे. निरनिराळ्या प्रसंगांत माणसाच्या मनाचीं होणारीं आंदोलनेंहि सूक्ष्मपणें रंगविलीं आहेत. परंतु कथानकाच्या अस्ताव्यस्तपणामुळे कादंबरीचें वाचन करतांना वाचकाची अेकाग्रता होत नाही.

**मधली भिंत :** तीन अनुवादित व दोन स्वतंत्र कथांचा हा संग्रह आहे. त्यांत मधली भिंत ही दीर्घ कथा झोलाच्या कादंबरीच्या आधारें लिहिली आहे. तिने ६४ पानें व्यापिलीं आहेत. बाकीच्या १६ पानांत १० पानें स्वतंत्र कथांचीं व ६ पानें अनुवादित अशा कथांचीं आहेत. मधली भिंत ही दीर्घ कथा मानवी स्वभावाच्या विवेचनापेक्षा आकस्मिक घटनांमुळे आकर्षक झाली आहे. आपल्या मुलीच्या हातून विवाहापूर्वी झालेली 'चूक' पचविण्यासाठी अेका महत्त्वाकांक्षी परंतु परिस्थितीमुळे हतबल झालेल्या गरीब अनाथ अरुणला पैशाच्या जोरावर पकडणारी यशोदाबाअी मोठी पाताळयंत्री बाअी आहे. त्याहिपेक्षा आपली अब्रू ज्याने वांचविली त्याला धिक्कारून विवाहानंतरहि आपलें आचारस्वातंत्र्य गाजविणारी अुषा हाहि अेक नमुना आहे ! आणि शेवटीं यशोदाबाअीच्या कारस्थानामुळे भलत्या पेचप्रसंगांत सांपडल्यावर अरुणला शरण जाण्यांत तिचा होणारा स्वभावपालट हाहि अेक कथानकरचनेचा नमुना आहे !, झोलाचें नांव घेतल्याने आपली बाजू निर्धास्त झाली हा लेखकाचा विश्वास वाचकाच्या कसोटीपुढे लटपटूं लागतो ! अरुणचें भावडें मन दारिद्र्याच्या यातनांमुळे व महत्त्वाकांक्षेच्या वेडामुळे या नव्या प्रयोगांत जास्तच व्याकुळ झालें. अुषेचें प्रेम मिळत नाही, नुसतें वैभव वाढतें आहे, अशा जीवनांत त्याला होणाऱ्या मानसिक यातना मात्र सूक्ष्मपणें व्यक्त केल्या आहेत. परंतु अरुणभोवतीं रचलेलें कथानक अगदीच ओबडधोबड आहे. दीपगृह हें दीपगृहाच्या प्रदेशांतील वातावरणाची भीषणता पटविणारें शब्दचित्र आहे. वंचना ही कथा तिन्ही अनुवादित कथांत बरी आहे. अेका डॉक्टराने आपला रोग गुप्त ठेवून प्रेमविवाह केला, परंतु रोगाचीं चिन्हें

दिसूं लागतांच आत्महत्या केली. परंतु आपल्या प्रेयसीला अशा यशस्वी वंचनेने प्रेमपूर्तीचें समाधान दिल्याचा आनंद मरतांना त्याला वाटला. आणि तें खरेंच होतें. त्याची विधवा पत्नी मृतपतीबद्दलचा आदर बाळगूनच त्याच्या प्रेमाच्या सहवासस्मृतीवर जगत होती. ही घटना पांचसहा पानांत परिणामकारकपणें रंगविली आहे. चुकलेले वाटसरू आणि फसवणूक या कथांतील कथाबीजें चांगलीं आहेत परंतु त्यांचा प्रत्यक्ष विस्तार खुरटलेल्या झुडुपासारखा झाला आहे. तरी त्याहि स्थितींत लेखकाच्या कल्पनाशक्तीचा परिचय होतो. या दृष्टीने ते दोन स्वतंत्र प्रयत्न नमूद करण्यासारखे आहेत.

**शिकार** : मुलांना शिकारीचें वातावरण कळावें व शिकाऱ्याच्या अंगच्या धाडस, प्रसंगावधान, अित्यादि गुणांची ओळख व्हावी या हेतूने आनंदीबाअी जयवंत यांनी हें पुस्तक लिहिलें आहे. स्वतःचा प्रत्यक्ष अनुभव व त्यांत मिळविलेल्या ज्ञानाची भर पडल्यामुळे पुस्तकांत जिवंतपणा आला आहे. अनुभवाने वर्णनांत दिसणारी लेखिकेची समरसता सर्वत्र दिसून येते. मुलांसाठी अुपयोगांत आणलेलें कथाप्रसंगाचें तंत्रहि चांगलें जमलें आहे. शिकारीचा अनुभव प्रौढांच्या जगांतहि फार थोडयांच्या वाटेस येतो त्यामुळे या कथा प्रौढांसहि रम्य वाटतील. या अभिनव जगाशीं बालकांचा परिचय करून देण्याचा हा सत्याधिष्ठित प्रयत्न अभिनंदनीय आहे.

**गं. भा. निरंतर**

## लेखसंग्रहः—

**हिरवे कंदील**— ले० अनंत काणेकर; प्रका० स्कूल अ‍ॅण्ड् कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर; मूल्य रु. २॥.

महाराष्ट्राला सुपरिचित असलेले श्री. अनंत काणेकर यांच्या ४ स्फुट, २ वाङ्मयीन, ३ राजकीय, ३ रंगभूमिविषयक अशा १२ लेखांचा आणि ३ वाङ्मयीन व २ राजकीय अशा ५ भाषणांचा संग्रह ‘हिरवे कंदील’ या पुस्तकांत केला आहे. श्री. काणेकर यांनीच अुल्लेख केल्याप्रमाणे त्यांच्या राजकीय दृष्टिकोणांत झालेला फरक व त्यांच्या मतांची झालेली अुत्क्रांति या लेखभाषण-संग्रहावरून स्पष्ट दिसते.

‘मन्वंतराच्या स्मृति’, ‘अेक बायको जिवंत असतां’, ‘माझीं सुखस्वप्नें’ अित्यादि **स्फुट लेख** मनोरंजक आहेत.

**वाङ्मयीन लेखांत व भाषणांत** वाङ्मय आणि आधुनिकता, वास्तवता, भूतदयावाद, साम्यवाद यांच्यासंबंधी माहितीपूर्ण विवेचन आलें असून, साहित्यिकाची भूमिका स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. “जीवनाच्या कुठल्याहि क्षेत्रांतलें सबंध सत्य पाहणें आणि तें निर्भयपणें, निर्भीडपणें प्रकट करीत राहणें, हेंच कार्य जातिवंत साहित्यिक नेहमीं करीत असतो (पृष्ठ ५) व “सबंध सत्य पाहण्याची ज्याला ज्याला दृष्टि आहे तो तो साहित्यिक” (पृष्ठ २१) ही केलेली व्याख्या विचार करावयास लावणारी आहे. “राजकीय पक्ष आणि विशिष्ट तत्त्वप्रणाली ललितलेखकांची दिशाभूल करीत आहेत. सत्ता नसते तेव्हां ‘सबंध सत्य दिसलें तरी तें सांगणें बरें नव्हे’ असें ललितलेखकांना ते गोंजारून सांगत असतात; सत्ता असते तिथे लेखकाला अंधारकोठडींत डांबतात किंवा त्याचें प्रतिभाशाली मुंडकें अुडवतात (पृष्ठ २३).” तेव्हा मार्क्सवाद, समाजवाद वगैरेंचा ललित लेखकाने अभ्यास जरूर करावा, परंतु ललितलेखकाची ‘संपूर्ण वास्तवतेशीं गांठ असते असा अिशाराहि काणेकरांनी दिला आहे. “पूर्वग्रहाविष्ट न होतां धार्मिक, सामाजिक, राजकीय कोणत्याहि अभिनिवेशाच्या आहारीं न जातां वास्तवतेकडे अचल, निर्भय दृष्टीने पाहणें हीच ललितलेखकाची ‘शास्त्रीय दृष्टि’ (पृष्ठ २५) असें त्यांनी प्रतिपादिलें आहे. तसेंच “लेखण्या मोडून बंदुका घ्या” ह्याचा अर्थ “लेखण्यांचा बंदुकांसारखा अुपयोग करा” असा आहे असें ते म्हणतात.

**राजकारणविषयक** लेखांत व भाषणांत गांधींची अहिंसा, टिळकसंप्रदाय, निःशस्त्र प्रतिकार यांसंबंधी स्वतःचे विचार मांडून महाराष्ट्र राजकारण, वाङ्मय, कला, संगीत अित्यादींत

कसा अग्रेसर आहे हें स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. शेवटच्या दोन मापणांत महायुद्ध व त्यामुळे निर्माण होणाऱ्या नव्या जगाच्या वा क्रांतीच्या बाबत साहित्यिकांची जबाबदारी काय तें सांगितलें आहे.

नाट्यमन्वंतराचा अनुभव जमेस धरुन धंदा व कला या दृष्टीने विचार करून **रंगभूमीचें भवितव्य** अुज्ज्वल होण्यास कांही अुपायहि श्री. काणेकरांनी सुचविले आहेत. 'महाराष्ट्र-रंगभूमि' याअैवजी 'महाराष्ट्र-नाट्य' व 'रेजिसर'ला 'नाट्यनियंता' हे त्यांनी स्पष्टीकरणासह सुचविलेले शब्द लक्षांत घेण्याजोगे आहेत.

श्री. काणेकर यांनी आपलीं मतें चर्चात्मक पद्धतीने, निर्भयपणें, जोरदार व परिणामकारक भाषेत मांडलीं असल्यामुळे हा संग्रह वाचनीय झाला आहे यांत शंका नाही.

**न. का. घारपुरे**

**समाजांतील भोळ्या समजुती—मेंदू आणि मन**—ले० रा. ब. डॉ. द. ल. सहस्रबुद्धे; (प्रका० ग्रंथकर्ता, डे. जिमखाना, पुणें ४; पृष्ठें १५२; मू. २॥ रु.).

या ग्रंथांत कर्त्याने 'मेंदू व मन' यांच्याविषयीचें 'शास्त्रीय' ज्ञान प्राप्त करून घेतल्यास 'समाजांतील भोळ्या समजुतीं'चें बरेंच निराकरण करतां येण्याजोगें आहे ही विचारसरणी प्रतिपादिली आहे. कोणत्याहि प्रश्नास शास्त्रीय ज्ञानाची कसोटी लावून पाहण्याचीप्रवृत्ति प्रत्येक जिज्ञासूने आपणांत बाणवून घेतली पाहिजे. सृष्टींतील कोणतीहि घटना असो, तिजविषयींच्या पुराव्याचें निरीक्षण व प्रयोग, तिच्या कार्यकारणसंबंधाचा शोध, त्यासंबंधीची प्रथम काल्पनिक जुळणी व नंतर त्याच्या अनुभवाचा पडताळा—या पद्धतीने त्या घटनेचा अभ्यास केल्यानेच तिचा शास्त्रीय खुलासा आपणांस होतो व त्यामुळे अज्ञानाचें निरसन व लोकभ्रमांचा नायनाट होतो. मनुष्याची खरी प्रगति अशा शास्त्रीय ज्ञानाच्या अुदयानेच होअू शकेल. या सामान्य विचारसरणींतच या ग्रंथाचा अुगम आहे.

ही विचारसरणी अर्थात् स्वागतार्ह आहे यांत शंका नाही. परंतु ती मान्य करूनहि या ग्रंथांतील सारींच अनुमानें सर्वमान्य होतील असें नाही. "अीश्वर, आत्मा व मन या सर्व कल्पना आहेत" (प्र. पृ. १), "मन व शरीर हीं निराळीं नाहीत, अेकच आहेत" (पृ. १०), "ज्याला जड पदार्थ म्हणतात, त्यांखेरीज मन असें 'अजड' कांहीच नाही" हीं अगर यासारखीं अनुमानें सर्वांस मान्य होणें कठिण आहे.

परंतु अर्वाचीन शास्त्रीय ज्ञानाच्या साहाय्याने 'मेंदू, मज्जातंतु व अिंद्रियें' यांचें स्वरूप व कार्य यांसंबंधी प्रथमतः विवेचन करून व त्याच्या साहाय्याने 'प्राण्यांची वागणूक', 'सहजगत्या होणाऱ्या चुका', 'निद्रा', 'स्वप्नें, भास व मुताटकी', 'शकुनवाचन', 'विचारवाचन', 'मृतात्मा', 'मन', 'अुपजतबुद्धि व विचारबुद्धि', 'नियति व प्रयत्न' वगैरे अनेक विषयांचें लेखकाने जें प्रकरणवार विवेचन केलें आहे तें फारच अुद्बोधक आहे यांत शंका नाही. या सर्व विवेचनांत शास्त्रीय पद्धतीवर केंद्रित केलेलें आपलें लक्ष लेखकाने यत्किंचितहि चळूं दिलेलें नाही ही फार अभिनंदनीय गोष्ट आहे.

हें विवेचन वाचून सामान्य वाचकांचा वरील विषयांसंबंधी बऱ्याच बाबतींत भ्रमनिरास होअील. यासाठी प्रत्येक सुबुद्ध वाचकाने हें पुस्तक अवश्य वाचावें असेंच आहे.

परंतु या पुस्तकाला अेक फारच मोठें गालबोट लागलें आहे. तें म्हणजे भाषेचें आणि परिभाषेचें अक्षम्य शैथिल्य व मुद्रणाचे दोष हें होय. कांही अुदाहरणें पुढे दिलीं आहेत.

**भाषाशैथिल्यः**— (१) 'पुष्कळ प्राण्यांत अशा कांही गोष्टी होतांना आढळतात की, त्या विचारानेच झाल्या असल्या पाहिजेत असें जोराने लोक सांगतांना दिसतें' (पृ. १३). (२) कॉक्लियांतील पेशीवरून आवाजाची कल्पना ठरते, तर अर्धवर्तुळ नळ्यांतील पेशीवरून

शरीराची स्थायी स्थितीची कल्पना येते (पृ. ३६). (३) कंटाळवाणी गोष्ट पुनः पुनः घडल्याने त्याकडे दुर्लक्ष करण्याचा स्थगित ओघ (Inhibition) सुरू करणें हें काम मेंदूच्या सर्वांत वरिष्ठ भागाकडे आहे (पृ. ४१) अित्यादि.

परिभाषाशैथिल्यः— (१) चक्षुरिंद्रियांतील प्रतिग्राहक पडद्याला कांही ठिकाणीं मूळ अिंग्रजी (Retina) हा शब्द कायम ठेवला आहे (पृ.५), तर कांही ठिकाणीं 'मज्जापटल' (पृ.२६) असा शब्द वापरला आहे. मज्जा = मेंदू व पटल = पडदा या दोन शब्दांच्या समासाला 'Retina'-चा अर्थ कसा येणार ? (२) Nerve-fibre याला 'मज्जाधागा' असा मिश्र सामासिक शब्द बनविला आहे (पृ. १८). 'अंतरसंवेदना' व 'बहिरसंवेदना' (पृ. १७) अशा संज्ञा लिहिण्यांत कांही चुकतें हें लेखकाच्या घ्यानांत आलेलें दिसत नाही. पृ. ७५ वर 'भुरें' हा शब्द दोन वेळां आला आहे. तो 'धुरें' असा असावा. 'भुरें' हा शब्द कर्वे—दाते यांच्या म. शब्दकोशांत आढळत नाही. (३) पृ. २६ व ३७ वर हृदयाचे किंवा आंतड्याचे स्नायूंस 'Voluntary' (स्वेच्छानुवर्ती) व अितरांस 'Involuntary' (मज्जाशासित) म्हटलें आहे. यांत कांही विपर्यय होत नाही ना ? (४) पृ. १४९ वर पारिभाषिक शब्दसूचि दिली आहे. तींत Hybernate = सुषुप्ति असें दिलें आहे. अिंग्रजी शब्द क्रियापद आहे, तर मराठी शब्द नाम आहे. पण अधिक दोष म्हणजे अर्थच चुकला आहे. सुषुप्ति म्हणजे झोंप, तंद्री (Hybernation) नव्हे.

मुद्रणदोष : (१) द्रावक (secretary)—मज्जातंतु पृ. ११, १५०, १५१. (secretory) पाहिजे. (२) अंतर्वाहक = efferent (पृ. १५१) afferent हवें. अशीं अुदाहरणें पुष्कळच आहेत.

म्हणून लेखकास सूचना अशी की त्यांनी ग्रंथलेखन अवश्य चालू ठेवावें. त्या बाबतींत त्यांचा अधिकार सर्वमान्य व मोठा आहे. परंतु भाषा, परिभाषा आणि मुद्रण या बाबतींत त्यांनी तज्ज्ञांचें संपादनसाहाय्य घेतल्याशिवाय ग्रंथ वाचकाच्या हातांत ठेवूं नये. मात्र या दोषांशिवाय ग्रंथाची महती मान्य होण्याजोगीच आहे, व त्याबद्दल आम्ही कर्त्यांचें अभिनंदन करीत आहों हें या परीक्षणाच्या वाचकांनी व खुद्द ग्रंथकर्त्यांनी विसरूं नये.

दे. द. वाडेकर

## अिंग्रजी भाषान्तरः—

**Saubhadra**— S. B. Talekar, 390 B/1 Narayan, Poona 2. Price Rs. 5.

मराठी साहित्यांतील कोणत्याहि कृतीचा परभाषेंत अनुवाद व्हावा ही गोष्ट मराठीच्या अभिमान्यांस प्रिय अशीच व्हावयास हवी. त्यांतून हें भाषान्तर अिंग्रजी असावें ही गोष्ट अधिकच अिष्ट होय. कारण यामुळे ती सार्‍या पाश्चात्य वाचकांना म्हणजे अेका परीनें, भाषान्तरकर्ता म्हणतो त्याप्रमाणे, सर्व जगाला (world at large, प्र. पृ. ६४) अुपलब्ध होते, आणि तिला जागतिक मान्यता मिळण्याचा संभव असतो. श्री. तळेकरांनी किर्लोस्करांच्या रसिकमान्य अशा सौभद्र नाटकाचें अिंग्रजी भाषान्तर अुपलब्ध करून दिलें याबद्दल परकीय वाचकांनीच नव्हे तर मराठीच्या भक्तांनी त्यांचें वस्तुतः ऋणी असावयास हवें. मूळ नाटकाच्या भाषान्तराबरोबर अेका प्रदीर्घ प्रस्तावनेंत किर्लोस्करपूर्व मराठी रंगभूमि, किर्लोस्करांचें चरित्र आणि त्यांच्या अितर कृति, सौभद्राचा अंकवार सारांश, त्यांतील व्यक्तिदर्शनकौशल्य, त्याच विषयावरील अितर नाटकांशीं तुलना, अित्यादींची चर्चाहि त्यांनी केली आहे. भाषान्तराच्या शेवटीं पन्नास पानें टिप्पणी जोडून पौराणिक कथांचा परकीय वाचकांकरिता आवश्यक असणारा खुलासाहि केला आहे. ग्रंथकर्त्यानें याप्रमाणे प्रस्तुत ग्रंथ तयार करावयाकरिता फार परिश्रम केले आहेत ही गोष्ट कोणाहि वाचकास दिसून येअील. श्री. तळेकर यांनी याबाबत अितकी मेहनत केली याबद्दल खरोखर आम्हांस सहानुभूति वाटते, पण यापेक्षा अधिक समाधान व्यक्त करणें मात्र शक्य होत नाही याबद्दल खेद होतो. कारण भाषान्तराचा

हा प्रयत्न बराच अयशस्वी झाला आहे. अितकेंच नव्हे, तर तो परकीयांच्या चेष्टेला पात्र होअील अशी फार भीति वाटते.

ज्या भाषेमध्ये अशाद्या कृतीचा अनुवाद व्हावयाचा त्या भाषेचें भाषान्तरकर्त्याचें ज्ञान अुत्तम हवें ही गोष्ट मतभेदातीत आहे. श्री. तळेकरांचें अिंग्रजीवरील प्रभुत्व फारच शंकास्पद दिसतें. त्यामुळे मूळांतील भाव भाषान्तरांत जसा अुतरत नाही, त्याप्रमाणे भाषान्तरांतील भाषाहि शुद्ध आणि सुबोध अुतरत नाही. अेक वेळ मूळांतील भाव तंतोतंत न अुतरला तरी चालेल, पण अिंग्रजी तरी शुद्ध आणि अिंग्रजी वळणाचें यावयास हवें. नाहीतर त्यामुळेच भाषान्तराची यट्टा होअून मूळग्रंथाचा चांगुलपणाहि वाचकाच्या नजरेआड व्हावयाचा. भाषान्तरामध्ये आणि त्याबाहेरहि अिंग्रजीच्या दृष्टीने हास्यास्पद चुका आणि 'बाबू पीचेलाल' पद्धतीचें लेखन झालें असल्याने हेतुदृष्ट्या अभिनंदनीय अशा या प्रयत्नामुळेहि अेक प्रकारचा अुद्वेग वाटतो. दिङ्मात्र अुदाहरणें येथे देतों. ग्रंथाच्या आरंभीं तरी लेखक अधिक दक्ष असतो. पण तेंहि लेखन कसें झालें आहे तें पाहावें. नांदीचीं दोन पदें होअून सूत्रधार गद्यांत बोलूं लागला आहे. मूळांतलें वाक्य असें:- "प्रेमपुरस्सर अीश्वराचें स्तवन अितकें झालें तरी पुरे आहे." भाषान्तर असें:—Brief is my panegyric! But it is enough, as fully faithful to him. यांत स्तवन अल्प झालें असल्याची भावना मूळांत वाच्य नाहीच, पण असलीच तर महत्त्वाची नाही. पुढे प्रेमपुरस्सर याचें भाषान्तर fully faithful याने कसें होतें ? प्रेमाचा अर्थ येथे devotion या शब्दाने येअील व तीवर आधारलेला अेखादा शब्द येथे हवा. पण faith या शब्दाने ओढूनताणून तो आणला तरी faithful याचा अर्थ 'यथार्थ' किंवा अिमानी असा होअील. full of faith निराळें आणि faithful निराळें. him मधील h मोठा हवा. शिवाय as चा अुपयोग as it is या अर्थी कारण दाखविण्याकरिता केला आहे, तोहि चुकीचा ठरेल. दुसरेंच वाक्य बघावें. मूळ असें:— "आता घरीं जाअून भार्येचें अनुमोदन घेअून नंतर नाटकास प्रारंभ करावा.' भाषान्तर असें:— "I should now go home to begin the performance of my beloved's choice." खरोखर भार्येचें अनुमोदन नाटकाच्या प्रयोगाची तयारी झाली आहे की नाही हें ठरविण्यापुरतें आहे. भाषान्तरावरून बोध होतो की नाटक कोणतें व्हावयाचें हें नटी ठरविणार. Beloved's choice याचा अर्थ आपल्या प्रेयसीचीच निवड करणें हा होअील हा भाग वेगळाच. येथे अिंग्रजीचेंच अज्ञान व्यक्त झालें असें नाही, मूळ मराठीचाहि अर्थ कळला नाही असेंहि होतें. आणि हें तर स्वभाषा मराठी असणाऱ्या भाषान्तरकर्त्यास विशेष अनुचित. यापुढे 'झाली ज्याची अुपवर दुहिता' हें नटीचें पद येतें. त्याचेंहि पहिलें वाक्य पाहावें:— Uneasy lie the parents that have a daughter eligible for marriage. लग्नास मुलगी जर eligible असेल तर त्यांत चिंता करण्याचें कारण काय ? marriageable हें चालेल. पण परकीय आणि विशेषतः पाश्चात्य वाचकास त्याचें स्वारस्य कळणार नाही. आपल्याकडील विवाहविषयक परिस्थितीचा अुलगडा याने होत नाही. निदान पाटीमागे टीपांत तरी, खुलासा हवा होता. पुढील वाक्य तर विशेषच हास्यास्पद होअील. मूळांत "बरें, हें सर्व हवें तसें मिळून लग्न झालें तरी चिंता संपते काय ?" असें आहे. अिंग्रजी असें:— And even if they celebrate her nuptials, in all good anticipations and under fulfilled conditions, their anxiety does not end withall, as if it will never. Nuptials मधील शारीरिक लग्नाची सूचना येथे न घेतली तरी in all good anticipations म्हणजे काय, आणि under fulfilled conditions म्हणजे तरी काय ? 'सर्व हवें तसें मिळून' येवढ्या साऱ्या अर्थाकरिता कोण हा हास्योत्पादक खटाटोप ! as if it will never यामध्ये as पुढे if कशाला ? वर as पुढे it is पाहिजे होतें तेथे तें दिलें नाही, येथे if नको आहे तरी दिलें आहे. साऱ्या अिंग्रजीचेंहि अपूर्व ज्ञान येथे व्यक्त होत आहे. पुढे 'प्रिये' या संबोधनाचें भाषान्तर 'my dear me' असें केलें आहे. My dear पुढे me कशास हवें ? बहुधा my dear आणि dear me या दोन वाक्यांचा

अनुक्रमणिका

संकर झाला असावा. पण dear me चा अर्थ my dear पेक्षा अगदी वेगळा आहे. अेका पानाच्या व तेंहि आरंभींच्या पानाच्या मजकुरांत हा अितका प्रकार आहे. सर्वच भाषान्तरांत हें असें झालें आहे व त्याबाहेर दिलेल्या टीपांत किंवा विवेचनांतहि झालें आहे. अितर ठिकाणचीं अुदाहरणें अशीं:—मूळ:—विदूषक—अिकडे येतांना वाटेंत कुत्र्याच्या शेपटीवर पाय पडला; त्यामुळें स्नान करावें लागलें. अिंग्रजी:– My hasty step trod on the *bitch of a tail* and hence this contingency of late bath. बहुधा tail of a bitch म्हणावयाचें असावें. विदूषकाला हास्यास्पद करावयास मुद्दाम अुलट केलें आहे की काय न कळे. कारण हीच चूक मागे टिप्पणींतहि केली आहे. पण किर्लोस्करांच्या मनांत नसतांना परकीय वाचकांकरिता हें करण्याचें कारण काय? यानें विदूषक हास्यास्पद न होतां हें भाषान्तर तें करणाराच्याच अंगावर यावयाचें. भाषान्तरांत जरूर नसलेलें स्वातंत्र्य काय म्हणून घ्यावें? कुत्रा मूळांत आहे त्याची भाषान्तरांत कुत्री कशाकरिता केली? मूळांत घाअी किंवा गडबड नसतांना भाषान्तरांत hasty शब्द कशास आणला? व शेवटीं पुनः स्नान करावें लागलें याकरिता contingency हा मोठा शब्द कशाला? आडंबराच्या पाठीमागे लागून भाषान्तरकर्त्यानें भाषान्तर अनेक ठिकाणीं हास्यास्पद केलें आहे. 'भल्या मनुष्यानें या कृष्णाच्या नादीं लागूं नये' हें साधें वाक्य. त्याचें अिंग्रजी पाहा:— Not even the utmost stretch of gentility should ever stand to befriend this Krishna. या जडजंबालाला काय म्हणावें? मूळ:—'आजचा हा रंग फार नामी अुठला.' तिसऱ्या अंकांतील कृष्ण-बळरामाचा गमतीदार खटक्यास अुद्देशून हें वाक्य आहे. त्याचें अिंग्रजी:—'Full excellent has been the colouring of this medley'. मूळ:—'दांभिकपण ये वर फुटुनी.' त्याचें अिंग्रजी:— Hypocrisy betrays him, and bursts open on his face. मूळ:—कोणी नुसतेंच दर्शन घेअून कांही फळफळावळ पुढे ठेवताहेत असा धुमाकूळ तिथे माजून राहिला आहे. अिंग्रजी असें:— all a *ravishing* confusion of salutes and *salutary* presents. कृष्णाला आपण वडील भावाबरोबर **कपटाचरण** करीत आहों हें बरें वाटत नाही. त्याचे अिंग्रजी अुद्गार असे:— Forgive me, my soul! for my *conceit*. बहुधा deceit असें म्हणावयाचें असावें. बिचाऱ्या कृष्णाच्या माथीं हा malapropism मारून त्याला परकीयांच्या दृष्टीनें हास्यास्पद केला. भाषान्तरांत नको तेथे स्वातंत्र्य घेतलें आहे. नटी 'आपल्याच नादांत कांही गुणगुणत आहे' असें मूळांत आहे. भाषान्तरकर्त्यानें नटीवर रूपक केलें. 'The bee seems to be humming something in its own engrossment. यांतील शेवटला भाग बाजूला ठेवला तरी नटीला bee बनविण्याचें कांही कारण दिसत नाही. स्त्रीला bee करण्याचें अिंग्रजी काव्याला सुचलें नाही म्हणून मूळ मराठींत नसतांनाहि कर्त्यानें अिंग्रजी भाषेस हा प्रयोग सादर केला काय? का पाखरूं या मराठी शब्दाची छाया नकळत यांत अुमटली? हें स्वातंत्र्य जेथे घ्यावें तेथे घेतलें नाही. कुचभल्ली याचें भाषान्तर speary breast असें शब्दास शब्द ठेवून केलें आहे. मूळांतच ती फार अतिशयोक्ति होते. पण तसा प्रयोग अनेक वेळां झाल्यानें तीमधील अनिष्टता संस्कृत वा मराठी या भाषांत कमी झाली आहे. पण अिंग्रजींत तसा प्रचार नसतांना तो घालण्याचें कारण नव्हतें. यामुळे झाली तर परकीयांची आमच्या सौंदर्यदृष्टीबद्दल गैरसमजूतच होअील. अिंग्रजीच्या साध्या चुकाहि किती तरी झाल्या आहेत accused *for*, *a* deadilest poison, at the dead of *the* night, come across *with* many, self-respect*ful*, saved *the credit* of the Pandavas (पांडवांची अब्रू राखली), *climaxing* imprudence– अकलेची कमाल, हीं सहजगत्या दिसलेलीं अुदाहरणें होत.

हा भाषान्तराचा भाग झाला. प्रस्तावनेंत आलेल्या साऱ्या विषयांची तादृश आवश्यकता सौभद्र नाटकाच्या परकीय वाचकास आहे असें वाटत नाही. किर्लोस्करांचें चरित्र आणि त्यांचें वाङ्मय यांची थोडी माहिती देअून मराठी रंगभूमीला त्यांनी लावलेलें निराळें वळण याविषयीची

थोडी चर्चा, अितकें पुरें होतें. सौभद्राखेरीज त्यांच्या अितर नाटकांचें अितकें विवेचन, नाटकाचा अंकवार गोषवारा, व्यक्तिदर्शनविवेचन, कालस्थलांचा आराखडा, त्याच विषयावरील दुसऱ्या नाटकाशीं सौभद्राची तुलना या गोष्टी येथे मुळीच आवश्यक नव्हत्या. मागे दिलेल्या टिप्पणी मात्र खऱ्या अुपयुक्त आहेत; अर्थात् परकीय वाचकांच्या दृष्टीने. त्यांतहि युक्तायुक्तविवेकाला जागा नाहीं असें नाही. पण भाषान्तरकर्त्याने हें नाटक अेखाद्या पाश्चात्य विद्यापीठांत विद्यार्थ्यांना अभ्यासाला नेमलें आहे अशा थाटाने अिकडे जसें संस्कृत नाटकांच्या बाबत परीक्षेच्या दृष्टीने केलेलें असतें तसा सारा प्रपंच केला आहे. यांतील अिंग्रजीचें स्वरूपहि वर दिल्याप्रमाणेच आहे हें सांगावयास नकोच. या साऱ्याच्या जोडीला मुद्रणशैथिल्य. स्वतः ग्रंथकर्त्याने दिलेल्या दोन पानांच्या शुद्धिपत्राबाहेरहि अनेक चुका दाखवितां येतील, जसें:—Relations-inl-aw (पृ. २), *verulent* (vi) पृ. १५६, a tribune (tribute ?) पृ. ६४, *void* of mark (wide असावें. हा मुद्राराक्षस कीं भाषेचें अज्ञान !) पृ. १७४ अित्यादि. जगापुढे ठेवलेल्या (ग्रंथकर्ताः—(1) releasing this book to the world—Foreword; (2) Saubhadra is being submitted to the world at large, प्रस्ता. पृ. ६४). या ग्रंथाच्या शुद्धिपत्राच्या नांवांत सुद्धा Erata असें छापून शुद्धीला वाव ठेवला आहे ही गोष्ट आमच्या मुद्रणव्यवसायाची बदनामी जगाच्या चव्हाट्यावर करणारी नाही काय ? Errata या शब्दामधील ही गलती लक्षांत येअूनहि हें शुद्धिपत्र ग्रंथकर्त्याने ग्रंथांत तसेंच राहूं द्यावें ही चालढकलीच्या वृत्तीची कमाल आहे.

पण या विचारापेक्षा मुख्य भाषान्तराचें अिंग्रजी व त्यामुळे भाषान्तरांत आलेली अयथार्थता हा भागच खेदजनक आहे. असें असतांना मराठीमधील अनेक विद्वद्वर्यांनी या गोष्टीकडे दुर्लक्ष करून त्याचा गौरव केला आहे असें या ग्रंथाच्या जाहिरातीवरून (केसरी–६ आक्टोबर १९४४) दिसतें. अितरांनी काय गौरव केला आहे तें कळण्यास मार्ग नाही. पण प्रस्तावनाकार अमरनाथ झा, अुपकुलगुरु, अलाहाबाद विद्यापीठ, यांनी आपल्या सव्वादोन पृष्ठांच्या प्रस्तावनेंत भाषान्तराविषयी पुढील अेकच वाक्य लिहिलें आहे:—The translator has done his work well and his rendering is very readable. मूळांतील अर्थ भाषान्तरांत कितपत अुतरला आहे हें मूळाशीं भाषान्तर ताडून पाहणें शक्य नसल्याने सांगतां येणें आपल्यास अशक्य असल्याचें त्यांनीच लिहिलें आहे. भाषान्तर Readable झालें आहे असें म्हटल्याने काय गौरव व्यक्त होत असेल तो होवो, पण त्यांच्या सौजन्याने मराठी वाङ्मयावर अुपकार झाला असें आम्हांस वाटत नाही. पण अमरनाथ झा या मराठेतर माणसाने आमच्या दोषांवर पांघरूण घातलें तरी आमच्या मराठी विद्वानांनीहि 'आपला माणूस' या भावनेने आवश्यक तें कर्तव्य करूं नये ही खेदाची गोष्ट आहे. प्रस्तुत ग्रंथ तयार करून तो छापून काढण्यांत कर्त्याचे अमित श्रम खर्ची पडले ही गोष्ट कोणासहि मान्य होअील. पण अशा कार्यात श्रम करण्याच्या तयारीपेक्षा भाषान्तर करण्याच्या क्षमतेला अधिक महत्त्व आहे. ग्रंथकर्त्याबद्दल शक्य तेवढी सहानुभूति बाळगूनहि असें म्हणावें लागतें की प्रस्तुत भाषान्तर सर्व जगाला सादर करण्याचें साहस कर्त्याने शक्य असल्यास अजूनहि करूं नये. त्यांतील अिंग्रजी वाचतांना पुष्कळ करमणूक होते. या अर्थाने अमरनाथ झा यांनी तें Readable आहे असें म्हटलें की काय समजत नाही. अितरांची करमणूक निर्भेळ असेल; मराठी वाचकांची मात्र खास दुःखमिश्रित असणार. मराठी कृतीचें असें भाषान्तर जगास सादर होण्यापेक्षा तें न झालेलें बरें असें वाटल्यावांचून राहत नाही.

रा. श्री. जोग

---

# परिषद्वार्ता

( चिटणिसांकडून )

म. सा. प. कार्यकारी मंडळाच्या सभा दि. ३०।८।४४ आणि २८।९।४४ रोजीं झाल्या. महत्त्वाचीं कामें:- प्रा. ध. रा. गाडगीळ यांची ट्रस्टी म्हणून नेमणूक झाली. धुळ्याच्या संमेलनासंबंधी विचार झाला.

**स्वाध्यायमंडळः**— पुढील व्याख्यानें झालीं:—

(१) श्री. के. नारायण काळे— वाचनाची कला.
(२) श्री. द. गं. कोपरकर— बौद्धदर्शन.
(३) डॉ. प्रा. प. ल. वैद्य— मराठी भाषेचें झर.

## १९४४ मधील परीक्षांचा कार्यक्रम

[सूचना— सर्व परीक्षा नव्या कालगणनेप्रमाणे सुरू होतील.]

### प्रथमा

| | | | |
|---|---|---|---|
| ता. ८ डिसेंबर | शुक्रवार | वेळ ११ ते २ | प्रश्नपत्रिका १ |

### प्रवेश

| | | | |
|---|---|---|---|
| ता. ९ डिसेंबर | शनिवार | वेळ ११ ते २ | प्रश्नपत्रिका १ |
| ,, | ,, | ३ ते ६ | ,, २ |

### प्राज्ञ

| | | | |
|---|---|---|---|
| ता. ११ डिसेंबर | सोमवार | वेळ ११ ते २ | प्रश्नपत्रिका १ |
| ,, | ,, | ३ ते ६ | ,, २ |
| ता. १२ डिसेंबर | मंगळवार | ११ ते २ | ,, ३ |

### विशारद

| | | | |
|---|---|---|---|
| ता. १३ डिसेंबर | बुधवार | वेळ ११ ते २ | प्रश्नपत्रिका १ |
| ,, | ,, | ३ ते ६ | ,, २ |
| ता. १४ डिसेंबर | गुरुवार | वेळ ११ ते २ | ,, ३ |
| ,, | ,, | ३ ते ६ | ,, ४ |
| ता. १५ डिसेंबर | शुक्रवार | ११ ते २ | ,, ५ |

## १९४४ सालासाठी दिलेलीं केंद्रें

(१) मुंबआी, (२) सायन, (३) पुणें, (४) सातारा, (५) तासगांव, (६) किर्लोस्करवाडी, (७) अहमदनगर, (८) कोपरगांव, (९) नाशीक, (१०) मनमाड, (११) जळगांव, (१२) खिर्डी, (१३) बामणोद, (१४) भुसावळ, (१५) सांगवी (बु.), (१६) खिरोदें, (१७) चाळिसगांव, (१८) मालोद, (१९) थोरगव्हाण, (२०) धरणगांव, (२१) धुळें, (२२) सोलापूर, (२३) पंढरपूर, (२४) रोहें, (२५) चिकोडी, (२६) संकेश्वर, (२७) बेळगांव, (२८) अमरावती, (२९) नागपूर, (३०) हैदराबाद (द.), (३१) नांदेड, (३२) परभणी, (३३) आंबेजोगाआी, (३४) सेलू, (३५) हिंगोली, (३६) अुंबरगें, (३७) परळीवैजनाथ, (३८) अुमरी, (३९) गुलबर्गा, (४०) औरंगाबाद, (४१) निपाणी, (४२) सांगली, (४३) अिंदूर, (४४) ग्वाल्हेर.

अुमेदवारांनी अर्ज करण्याची शेवटची तारीख १० नोव्हेंबर १९४४ ही आहे.

अर्जाच्या तक्त्यासाठी किंवा परीक्षांसंबंधी माहिती पाहिजे असल्यास 'चिटणीस, म. सा. परिषद्, टिळक रस्ता, पुणें २' या पत्त्यावर पत्रव्यवहार करावा.

[पुढील मजकूर मलपृष्ठ तीनवर पाहा.

अनुक्रमणिका

## नवीन सभासद

तहह्यात सभासद

श्री. मो. रा. पुराणिक, मुंबअी

साधारण सभासद

श्री. मो. ना. बेंडे नादेड

,, पं. त्र्यं. कुलकर्णी, भुसावळ

,, कौ. ग. नारखेडे ,,

,, शं. बा. अढावदकर ,,

,, ल. ना. वैद्य ,,

,, शु. र. खेवलेकर ,,

श्री. सु. बा. गुप्ता, भुसावळ

,, रा. श्री. नाडपुरोहित, बेळगांव

,, य. बा. देशपांडे, दोंडाअीचे

,, प्र. रा. मु टकर, पुणें

,, भ. त्रि. पंडित ,,

,, रा. ल. पोतदार ,,

,, रमाबाअी नारायण देशपांडे, यावल

,, ल. नी. छापेकर, चाळीसगांव

,, म. गो. देवते, पुसला

---

## साभार स्वीकार

१९ चतुर तुतारीवाली व पुष्पाराणी—ले० ल. द. बेंबलकर; मूल्य ५ आणे.

२० गंपूदादाचा लाकडदंड्या—ले० ताराबाअी मोडक; मूल्य ५ आणे.

२१ तीन पण अितर गोष्टी—ले० ल. द. बेंबलकर; मूल्य ५ आणे.

२२ अजितकुमार—ले० कु. ताराबाअी जाधव; मूल्य ४ आणे.

२३ प्रवासी गलिव्हर—ले० दीनानाथ म्हात्रे; मूल्य ६ आणे.

२४ विशाल संसार—ले० व्यं. शं. वकील; प्रदीप प्रकाशन; प्रका० वा. वि. भट, भीमराव वाडी, मुंबअी नं. २; मूल्य रु. १॥.

२५ आर्नीतेचें दिव्य—ले० प्रा. लक्ष्मणराव सरदेसाअी; सागर साहित्य प्रकाशन; मूल्य रु. २।.

२६ सुशिक्षित स्त्री—ले० व प्रका० वा. दा. पंडित, जळगांव; मूल्य रु. १।.

२७ बालकवि व त्यांची कविता—ले० व प्रका० वा. दा. पंडित, जळगांव; मूल्य ८ आणे.

२८ कोंकणी परिषद्, तिसरे बसकेची खबर. मुंबै.

२९ काव्यकलेचें अंतरंग—ले० के. नारखेडे; प्रका० द. र. कोपर्डेकर, ५२९ सदाशिव, पुणें २; मूल्य रु. २.

३० गांधीवादावरील आक्षेप व त्यांचीं अुत्तरें— ले० गोपाळराव कुलकर्णी; प्रका० महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबअी ४; मूल्य १॥ रु.

३१ झुंज—ले० ना. के. महाजन; प्रका० महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबअी ४; मूल्य ६ रु.

३२ स्वाध्यायमालेचीं १० प्रकाशनें— मूल्य प्रत्येकीं चार आणे.

३३ मराठी रंगभूमीचा अितिहास खंड १ ला भा. १ ला यक्षगान भागवत नाटक—ले० डॉ. य. गं. लेले; प्रका० डॉ. न. का. घारपुरे, चिटणीस, अभिनव शारदोपासक मंडळ, पुणें; मूल्य रु. २.

३४ दिवाळी अंक—चित्रा, स्त्री, किर्लोस्कर, मनोहर, चित्ररेखा, ध्रुव, महाद्वार, मौज, लोकयुद्ध, नवजीवन.

---

आर्यसंस्कृति मुद्रणालय, चिमणबाग, टिळक रस्ता, पुणें, येथे लक्ष्मण नारायण चापेकर यांनी छापिलें व पुणें येथे महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कार्यालयांत परिषदेकरिता रामचंद्र श्रीपाद जोग

## महाराष्ट्र-साहित्य-परिषद्-प्रकाशनें

- **मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास** (मानभावअखेर)— लेखक— कै. वा. अ. भिडे. मूल्य रु. १. सभासदांस आणे १२. ट. ख. निराळा.
- **महाराष्ट्र-साहित्य-परिषद्-अितिहास**— लेखक—प्रा. द. वा. पोतदार. मूल्य रु. ३. सभासदांस रु. १॥. ट. ख. निराळा.
- **शैक्षणिक मानसशास्त्र**— पारिभाषिक शब्दकोश. मूल्य तीन आणे.
- **शुद्धलेखनाचे नवे नियम**— मूल्य आणे २॥. ट. ख. निराळा.
- **महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका** (त्रैमासिक) वा. व. रु. ४॥. सभासदांस मोफत.




महाराष्ट्र-साहित्य-परिषद्
टिळक रस्ता, पुणें २.

अनुक्रमणिका